गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते !

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक १६ वें.

# प्रियंवदा.



हें

पुस्तक

श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र,

यांनीं लिहिलें.

[ तृतीयावृत्ति. ]



गिरगांव—मुंबई.

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.



दिसेंबर सन १९११.



किंमत ०-८-०.

# अनुक्रमणिका.



# दोन शब्द.



प्रस्तुत पुस्तक 'अलक किशोरी' नांवानें 'मनोरंजनां' त पूर्वी प्रसिद्ध झालें होतें; त्यांत कित्येक फेरफार करून आज स्वतंत्र पुस्तकरूपानें वाचकांस सादर करीत आहों.

आमचे गुर्जर बंधु श्रीयुत हरिवल्लभ कृष्णवल्लभ भट्ट, यांनीं गुजराथींत लिहिलेल्या 'पंडिता रत्नलक्ष्मी' नामक पुस्तकाचा, प्रस्तुत पुस्तक लिहितांना आह्माला बराच उपयोग झाला आहे. त्याचप्रमाणें प्रकरण ९ आणि १० यांत दिलेल्या कविता अनुक्रमें आमचे मित्र आणि व्यवसायबंधु श्रीयुत बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए., काव्यसंग्रहाचे संपादक, व श्रीयुत आठल्ये, केरळकोकिळचे संपादक, यांनीं रचिलेल्या कवितांतून घेतल्या आहेत, याबद्दल वरील तीनहि गृहस्थांचे आह्मी या ठिकाणीं आभार मानितों.

आमची ही 'प्रियंवदा' आमच्या प्रियभगिनींच्या आदरास पात्र होईल, अशी आशा आहे.

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीचें कार्यालय,<br>गिरगांव–मुंबई,<br>ता. १५ दिसेंबर, १९०६ इसवी. } **काशीनाथ रघुनाथ मित्र.**

---

# तिसरी आवृत्ति.

प्रस्तुत पुस्तकाची आज तिसरी आवृत्ति प्रसिद्ध करतांना आह्माला समाधान वाटतें. महाराष्ट्रानें या पुस्तकाचा असा गौरव केल्याबद्दल या ठिकाणीं सर्वांचे आभार मानून या तिसऱ्या आवृत्तीलाहि आमच्या प्रियबंधु भगिनीं-कडून उदार आश्रय मिळेल, अशी आह्मी उमेद बाळगितों.

**मुंबई,** १५ दिसेंबर, १९११. **का. र. मित्र.**

# प्रियंवदा.

## प्रकरण पहिलें.

## संन्यासिनी कोण ?

शिशिर संपून वसंतऋतूस नुकताच आरंभ झाला होता. दुपारीं कडक उन्हामुळें अंगांतून घामाच्या धारा लागत, तरीहि पहांटेस गुलाबी थंडी मुंबईतील लोकांस सुखवीत होती. विशेषतः सायंकाळचा वेळ मनोहर भासत होता. यावेळीं ब्याकबेवरील अपूर्व शोभा काय वर्णावी? समुद्राच्या विस्तीर्ण अशा सपाट पात्रांत भरतीच्या वेळीं मनोहर नृत्य करीत असलेल्या मोठमोठ्या लाटा, मंदगतीनें वहात असलेला शीतळ वारा, आणि सहल करावयासाठीं ह्मणून आलेल्या अनेक रूप-यौवन-धन-संपन्न युवयुवतींच्या इकडून तिकडे येरझारा, इत्यादि गोष्टींनीं या स्थळास विलक्षण शोभा आणिली होती. सहल करण्याकरितां येणाऱ्या लोकांमध्यें कित्येक हौशी तरुण आपल्या प्रियकरणींच्या हातांत हात घालून त्यांजबरोबर गुज गोष्टी बोलत चालले होते; कित्येक मातापितरें आपल्या गोजिरवाण्या बालकांच्या निर्दोष बालक्रीडेचें कौतुक करीत आणि त्या सुखानंदाचा अनुभव घेत

फिरत होतीं; कित्येक आपापल्या मित्रमंडळीशीं हास्यविनोद करीत, आणि कित्येक तर रूपसंपन्न नवयुवतींच्या मनोहर आननपंक्तीचें निरीक्षण करण्यांतच आपल्या नेत्रांचें सार्थक मानीत स्वैरगतीनें चालले होते. रस्त्याच्या एका बाजूस असंख्य शोभायमान गाड्यांची रांगची रांग उभी होती. या ठिकाणीं गाड्या उभ्या करून मंडळी पायींच सहल करी. वाळवंटामध्यें लहानलहान मुलांच्या मनसोक्त क्रीडा चालत. नजीकची बागहि यावेळीं स्त्रीपुरुषांनीं अगदीं गजबजून गेलेली असे. बागेला लागून असलेल्या रेल्वेच्या सडकेवरून या वेळीं पांचपांच मिनिटांनीं एकामागून एक जात असलेल्या गाड्यांचा देखावा मोठा मौजेचा दिसे. परंतु याशिवायहि लोकांचें चित्त वेधून घेणारे कित्येक प्रकार या ठिकाणीं होत असत. एकीकडे कोणी झाडाखालीं उभें राहून आर्यधर्माच्या महतीविषयीं उपदेश करीत होते, तर दुसरीकडे मिशनरी बाया व पुरुष आपल्या गायनवादनयुक्त व्याख्यानांनीं ख्रिस्ताची थोरवी गात होते. इकडे मैदानांत कित्येक तरुण बालमंडळीचे मेळे, देशाभिमान, राष्ट्राभिमान व दुसरेहि बरेच सदभिमान दुरभिमान मिश्रित पद्यें तालसुरावर मोठमोठ्यानें गाऊन प्रेक्षकांचें चित्ताकर्षण करीत होते. कोणी गोरक्षणावर व्याख्यानें देत होते, कोणी राष्ट्रीयसभेची माहिती सांगत होते, तर कोणी सुधारकांची आणि त्यांनीं आरंभिलेल्या सुधारणांची यथेच्छ निंदा करून गालिप्रदानयुक्त आवेशपर भाषणानें स्वतःला कृतकृत्य मानीत होते. असा, निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं भाषणें श्रवण करण्यासाठीं लोकसमुदाय एकत्र झालेला असे. हीं व्याख्यानें श्रोते आस्थेनें श्रवण करीत असत, अगर उगीच आपले करमणुकीखातर पांचदहा

मिनिटें तीं ऐकण्यासाठीं उभे रहात, तें सांगणें अंमळ कठीण आहे. तथापि एवढी गोष्ट खरी आहे, कीं, श्रोतेमंडळींपैकीं कित्येकजण फार आस्थेवाईक दिसत. कारण, नियमित वेळीं व नियमित स्थळीं हजर रहाणारे कित्येकजण दृष्टीस पडत. आतांशीं तर त्या तीन बत्तींजवळील दगडावर उभें राहून दर गुरुवारीं हिंदी भाषेमध्यें उपदेश करणाऱ्या संन्यासिनीचें भाषण ऐकण्यासाठीं मंडळीची अतोनात गर्दी होत असे.

ही संन्यासिनी आज सतत दोन महिने सदाचार, सद्वर्तन, पातिव्रत्य इत्यादि विषयांवर मधुर आणि सुलभ अशा हिंदी भाषेमध्यें उपदेश करीत असे. ही संन्यासिनी तरुण व तेजस्वी असून पहाणारांच्या मनांत तिच्याविषयीं श्रद्धा उत्पन्न करणारें दिव्य तेज तिच्या मुखावर झळकत असे. त्याचप्रमाणें प्रेक्षकांचें चित्त आकर्षून घेण्याजोगी तिच्या वाणींत दिव्य मोहिनी भरली होती. या बाईनें आपल्या रसभरित आणि बोधप्रद वाणीनें मुंबापुरवासियांना अगदीं तल्लीन करून सोडिलें होतें. ब्याकबेवर संध्याकाळच्या वेळीं फिरावयास येणारे-मग ते हिंदु, पारशी, मुसलमान कोणीहि असोत; त्याचप्रमाणें स्त्रिया, वृद्ध किंवा बालक असोत, या साध्वीचें उपदेशपर भाषण ऐकण्यासाठीं तुटून पडत. विशेषतः स्त्रीवर्गाची तर येथें गर्दी झालेली असे.

या स्त्रीश्रोत्यांमध्यें तेराचौदा वर्षांच्या एका सुंदर मुलीला संन्यासिनीच्या वचनामृताचें नेहमीं उत्सुकतेनें आणि एकचित्तानें पान करीत असतांना पुष्कळांनीं पाहिलें होतें. ही मुलगी दर गुरुवारीं संन्यासिनी यावयाच्या पूर्वीं थोडा वेळ वरील स्थळीं हजर असे व संन्यासिनीचें भाषण आटोपलें व ती निघून गेली म्हणजे

मग मागाहून ही आपल्या घरीं जात असे. संन्यासिनीचा उपदेश श्रवण करण्याचें ह्या मुलीला वेडच लागलें होतें, असें ह्मटलें तरी चालेल. संन्यासिनीविषयीं श्रद्धा आणि प्रेम हीं तिच्या अंतःकरणांत इतकीं जागृत झालीं होतीं, कीं, तिच्या डोळ्यांपुढून संन्यासिनीची मूर्ति केव्हांहि हलत नसे. सदासर्वकाळ ती संन्यासिनीविषयींच विचार करीत असे. ती एकटीच असली ह्मणजे स्वतःशींच विचार करीत बसे. ती ह्मणे "खरोखरच का ही संन्यासिनी असेल? माझं मन इच्याकडे इतकं कां बरं ओढ घेतं? तिची ती प्रेमळ मुद्रा दृष्टीस पडली कीं एकसारखं तिच्याकडे पहात रहावं आणि तिचं मधुर भाषण एकसारखं ऐकत रहावं असं मला कां होतं? तिचं रूप पाहून आणि तिचं भाषण ऐकून केव्हांहि माझी तृप्ति ह्मणून कां बरं होत नाहीं? तिला पहातांच माझ्या मनाची चमत्कारिक अवस्था होऊन तिला एकदम जाऊन कडकडून मिठी मारावी अशी अनावर इच्छा कां बरं उत्पन्न होते? खरोखर, ही मोठीच आश्चर्याची गोष्ट आहे! असं कां व्हावं, याचं कांहींच कारण माझ्या लक्ष्यांत येत नाहीं. संन्यासिनी कोण, मी कोण, तिचा माझा कांहींतरी संबंध? परंतु ती मला आईहूनहि प्रिय कां वाटावी? तिच्या दर्शनानं, तिच्या भाषणानं माझी वेड्यासारखी स्थिति कां व्हावी, हें एका परमेश्वरालाच ठाऊक! या सुकुमार, ज्ञानी, तेजस्वी स्त्रीनं इतक्या तरुण वयांत हा संन्यासमार्ग कां बरं स्वीकारला असावा? इला मुलंबाळं कुणीच का नसतील? आणि मुलंबाळं असल्यास त्यांनां टाकून कठोरपणानं का ही अशी वागत असेल? इच्या मुद्रेवरून आणि ज्ञानावरून तर ही असं कठोरवर्तन करीलसं दिसत नाहीं. ती मोठी दयाळु आणि तपस्विनीसारखी दिसते.

इचा एकंदर वृत्तांत समजून घ्यावा अशी माझ्या मनाला रात्रंदिवस एकसारखी तळमळ लागून राहिली आहे. पण परक्या माणसाला एकदम तें कसं विचारतां येईल ! आणि समजा मीं विचारण्याचें धाडसहि केलं, तर मला ती आपली हकीगत सांगेल का? तिला राग तर नाहीं येणार? छे, मला आतां नाहीं धीर निघत. काय होईल तें होवो, आज मी तिला विचारणारच !"

कुसुम याप्रमाणें दर गुरुवारीं घरांतून निघतांना संन्यासिनीला आज तिची हकीगत विचारणारच असा आपल्या मनाचा निर्धार करून येई; परंतु ब्याकबेवर येतांच तिचा तो विचार मनांतल्या मनांत जिरून जाई. किती झालें तरी ती अल्पवयी बालिका. एवढ्या अफाट समुदायासमोर धीर करून तिच्यानें कसें बोलवेल? तथापि तिची जिज्ञासा कमी न होतां उत्तरोत्तर एकसारखी वृद्धिंगतच होत चालली.

आज कुसुम नित्याप्रमाणें संन्यासिनीचें भाषण ऐकण्यासाठीं समुद्रावर आली होती. संन्यासिनीचें आजचें भाषण फारच हृदयद्रावक झाल्यामुळें कुसुमचें अंतःकरण अतिशयितच सद्गदित झालें आणि तिच्या अंतःकरणांत संन्यासिनीविषयीं कांहीं अकृत्रिम प्रेमाचा अननुभूत असा उमाळा आला. संन्यासिनीचें भाषण आज बरेंच लांबलें होतें. तें आटपेपर्यंत साडेसात वाजले. नंतर लोकांची दाटी हळुहळू विखरूं लागली. संन्यासिनीहि आपलें पुस्तक बगलेंत मारून आपल्या आश्रमाकडे जाऊं लागली. संन्यासिनीच्या उपदेशानें आणि तिच्यावर जडलेल्या अकृत्रिम प्रेमानें वेडी झालेली आमची कुसुम आपल्या इंदिरा नांवाच्या मैत्रिणीसह नोकराला बरोबर घेऊन हळुहळू संन्यासिनीच्या मागोमाग जाऊं लागली.

ती थेट तिच्या आश्रमापर्यंत गेली व आश्रम पाहिल्यावर नंतर घरीं परतली.

आजच्या रात्रीनें तर कुसुमला अधिकच अधीर केलें. तिला नाना प्रकारचीं सुखदु:खमिश्रित स्वप्नें पडलीं. ती एकदम दचकून उठूं लागली. बऱ्याच वेळानें अंत:करण स्थिर झाल्यावर ती स्वत:शींच ह्मणूं लागली "आतां मीं जें स्वप्न पाहिलं हें खरं असेल का? माझं अत्यंत प्रेमानं लालनपालन करणारीं आणि मला जीवापलीकडेहि जपणारीं हीं माझीं सख्खीं मातापितरं नसून खरोखरच का कुणी परकी आहेत? अन् दुसऱ्याच्या लेंकरावर का हीं एवढा जीव ठेवितात? छे, मला नाहीं हें खरं वाटत!"

विचार करतांकरतां कांहीं वेळानें कुसुमचा पुन्हा डोळा लागला. तिला आतां पडलेल्या स्वप्नांत तिनें अनेक गोष्टी पाहिल्या. त्या गोष्टींनीं तिच्या डोक्यांत एकच काहूर उठून संन्यासिनीचा वृत्तांत समजून घेण्याविषयींची तिची आतुरता अधिकच प्रबळ करून सोडली. तिचें आतांशीं खाण्यापिण्याकडे, वाचनाकडे किंवा दुसऱ्या कसल्याच गोष्टीकडे चित्त लागेना. एकसारखी संन्यासिनीची मूर्ति तिच्या डोळ्यांपुढें उभी राहिली होती. तिनें आपल्या मनाला आंवरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तिचा कांहींच इलाज चालेना. शेवटीं मनाचा निर्धार करून तिनें रविवारीं संन्यासिनीच्या आश्रमांत जाऊन तिला भेटण्याचें ठरविलें व आपल्या मैत्रिणीस तो विचार कळवून आपल्याबरोबर येण्याविषयीं तिचेंहि मन वळविलें.

आज रविवारचा दिवस. माधवरावांस आज आफिसांत जावयाचें नसल्यामुळें स्वयंपाकाची तयारी हळुहळू चालली होती. पण इकडे

कुसुमला तर आज जेवणखाण उरकतें केव्हां आणि आपण संन्या-सिनीच्या आश्रमांत जाऊन तिला भेटतों केव्हां, असें झालें होतें. एकेक पळ तिला घटकेसारखें आणि घटका प्रहरासारखी भासूं लागली. अकरांच्या सुमारास जेवण उरकल्यावर कुसुमनें आईची परवानगी घेऊन ती इंदिरेच्या घरीं गेली व तिला बरोबर घेऊन आपल्या नोकरासह बरोबर बारा वाजतां ती संन्यासिनीच्या आश्रमांत आली. संन्यासिनी नुक्तीच भोजन उरकून महाभारतांतील कांहीं कथाभाग वाचीत बसली होती. आपलें भाषण आस्थेनें श्रवण करण्यास समुद्रावर नेहमीं येत असलेल्या या दोघी मुली आज आपल्या आश्रमांत आलेल्या पाहून संन्यासिनीला प्रथम मोठें नवल वाटलें; परंतु तिनें आपल्या नेहमींच्या मधुरवाणीनें त्या दोघींचाहि आदरसत्कार करून त्यांनां आपल्याजवळ बसविलें आणि "एवढ्या दुपारीं इकडे कां आलां?" असा मोठ्या प्रेमानें प्रश्न केला.

कुसुम भीतभीत ह्मणाली "माई! मी नित्य आपलं भाषण ऐकत असत्यें. आपला सदुपदेश ऐकल्या दिवसापासून आपला वृत्तांत समजून घेण्याविषयीं माझ्या मनांत स्वाभाविक प्रेरणा झाली आहे. आपल्या परमार्थबुद्धीनं, व त्याचप्रमाणं भर तारुण्यामधें आपण धारण केलेल्या या भगव्या वस्त्रांनीं, माझं चित्त आकर्षून घेतलं आहे. आणि पुष्कळ दिवसांपासून मनाला लागून राहिलेल्या तळमळीनं आज मला इथं आपल्यापाशीं ओढून आणिलं आहे. देवि! आपण कुठून आलां आहां? आपला मूळ गांव कोण? कोणत्या कारणासाठीं ही विरक्तवृत्ति आपण स्वीकारली आहे? हें कृपा करून सांगाल का? मला फारच उत्कंठा लागली आहे. आपल्या हकीगतीपासून मला पुष्कळच बोध होईल, अशी माझी

खात्री आहे. यासाठीं माई ! या बालकाची आपल्या चरणीं एवढीच प्रार्थना आहे, कीं, आपला वृत्तांत सांगून मला कृतार्थ करा."

कुसुमचें हें लाघवी भाषण ऐकतांच संन्यासिनीचें अंतःकरण गहिंवरून आलें. तिच्या मनांत आपोआप प्रेमांकुर उद्भवले. ती ह्मणाली "बेटा ! मैं संन्यासिनी हूं. मेरा काम सबको सत्यमार्ग दिखलानेका है. जैसे के स्त्रीकू पत्नीधर्म, पुरुषकू पतिधर्म, बालककू पुत्रधर्म और छेवटका मोक्षधर्म. ए संसार सब प्रपंचकी जाल है. इससंबंधी व्याख्यान देके सबको बंधुभावना होवे, ओ दिखलानेके मेरे कामके लिये मैं उत्तरहिंदुस्थानसे आयी हूं. मेरी बात सुनके क्या फायदा है? प्रभु प्रभु कर बेटा, कल्याण होगा."

कुसुम नम्रतेनें ह्मणाली "भगवति ! मी आपल्यापाशीं बोध ग्रहण करण्यास आल्यें आहें. हें तेजस्वी ललाट, आणि या भगव्या वस्त्रांत लपेटलेला हा कांतिमान् देह स्पष्ट सुचवीत आहे, कीं, आपण बालसंन्यासिनी नाहीं. आपण या वेषास मुळींच पात्र नसून कोणा थोर कुळांतील आहां— कांहींतरी महत्संकटामुळंच आपण ह्या वेष धारण केला आहे, असं माझं मन मला सांगतं. बाळपणींच संन्यासदीक्षा धारण करणारांपासून बोध घेण्याजोगं कांहींएक मिळायचं नाहीं. तर आपल्यासारख्या कसल्यातरी संकटास त्रस्त झालेल्या साध्वीकडूनच तें प्राप्त होण्यासारखं आहे. यास्तव आपली समग्र हकीगत सांगण्याची कृपा कराल तर या बालकावर महान् उपकार होतील."

"बेटा ! अब क्या कहना? हट करनेकी क्या जरूर है?"

"माई ! आपल्या गरीब कन्येवर दया करा. आपली हकीगत समजून घेण्याची मला फारच उत्कंठा लागली आहे. माझा आशाभंग करूं नका."

कुसुमचा अत्याग्रह आणि उत्सुकता पाहून संन्यासिनी ह्मणाली "अच्छा बेटा! तुमारा इतना आग्रहहि है तो कल आव."

संन्यासिनीच्या या भाषणानें अत्यंत हर्षित होऊन "उद्यां जरूर येत्यें, कृपा करून मला आपला वृत्तांत सांगा," असें ह्मणून कुसुम घरीं गेली.

कुसुम उठून गेल्यावर संन्यासिनी स्वतःशींच विचार करूं लागली. ती ह्मणाली "ही मनोहर मुलगी कोण आहे बरं! मीं संन्यासदीक्षा धारण करण्यापूर्वींची माझी स्थिति इला माहीत असेल काय? माझा वृत्तांत ऐकण्याविषयीं ही इतकी उत्सुक कां बरें झाली आहे? मला ही इतका आग्रह कां ह्मणून करीत आहे? त्याचप्रमाणें माझ्या अंतःकरणांत हिच्याविषयीं स्वाभाविक प्रेम कां बरं उचंबळत आहे? कांहीं असो; माझा या संसाराशीं आतां काय संबंध आहे? मी तर विरक्त बनल्येंच आहें!" अशा प्रकारें स्वतःशींच शंकासमाधान करीतकरीत संन्यासिनी नित्यक्रमाप्रमाणें भारताची पोथी वाचण्यांत गढून गेली.

ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं कुसुम इंदिरेसहवर्तमान संन्यासिनीच्या आश्रमांत येऊन दाखल झाली.

चैत्र मासींच्या प्रखर तापामुळें अंगांतून घामाच्या धारा लागल्या आहेत; वसंताची बहार पूर्णपणें विकास पावली आहे; बाहेरील ठिकाणाप्रमाणें या वेळीं मुंबानगरींत आम्रवृक्षांवरून कोकिलांचे मंजुल स्वर जरी ऐकूं येत नव्हते, तरीहि एकंदरींत देखावा मोठा रमणीय भासत आहे; श्रीमान् हौशी लोक, घरांच्या दरवाजांवर व खिडक्यांवर टांगलेल्या पाण्यानें भिजविलेल्या वाळ्यांच्या पडद्यांतून सुटणाऱ्या मंद सुगंधित शीतल वायूचें सेवन करीत आराम

घेत पडले आहेत; विद्यार्थिवर्ग विद्यालयांमधून आपापल्या अभ्यासांत निमग्न होऊन गेला आहे; अशा वेळीं कुसुमकुमारी संन्यासिनीचा वृत्तांत श्रवण करण्याच्या उत्सुकतेनें तिला विंझण्यानें वारा घालीत तिच्या सन्मुख बसली होती. कांहीं वेळ इकडल्या-तिकडल्या गोष्टींवर उभयतांचें थोडेंसें भाषण झाल्यावर संन्यासिनी ह्मणाली "तुझा विशेषच आग्रह आहे तर ऐक बेटा!" असें ह्मणून तिनें आपला वृत्तांत सांगण्यास सुरुवात केली.

प्रकरण दुसरें.

## सासरीं प्रयाण.

उत्तरहिंदुस्थानांत कलकत्ता ह्मणून एक प्रख्यात शहर आहे, तेथें एका दक्षिणी ब्राह्मणाच्या घरीं इ. स. १८६५ च्या मे महिन्याच्या ५ व्या तारखेस माझा जन्म झाला. माझ्या पित्याचा मूळगांव कोंकणांत रत्नागिरी जिल्ह्यांत आहे; परंतु नोकरीनिमित्तानें कित्येक दक्षिणी लोक बंगाल्यांत गेले होते त्यांत माझा पिताहि होता. बाळपणचा वृत्तांत मला बरोबर आठवत नाहीं; परंतु आठ वर्षांनंतर, ह्मणजे माझें लग्न झाल्या दिवसापासूनची मला ठाऊक असलेली हकीगत सांगतें.

माझें लग्न लहानपणींच झालें, हें मीं वर सांगितलेंच आहे. त्यामुळें कोणत्या सालीं माझा विवाह झाला, त्याची मला आतां चांगलीशी आठवण नाहीं; परंतु मला एवढें पक्कें आठवतें, कीं, माझा विवाह झाला तो माझ्या मूळगांवींच झाला असून त्या वेळीं थंडीचा भर अतिशयित होता. यामुळें मला वाटतें, बहुतकरून हिंवाळ्यांत मार्गशीर्ष महिन्यामध्यें माझें लग्न झालें असावें. इतक्या लौकर माझें लग्न होण्याचें कारण माझ्या आजीचा (बापाकडील) अति आग्रह हें होय. आपण जिवंत असेपर्यंत एकदा नातीच्या कपाळावर अक्षता पडल्या ह्मणजे स्वर्गास हात लागला असें तिला झालें होतें, व माझे बाबा कांकूं करीत असतांहि एकसारखें त्यांच्या पाठीस लागून तिनें

माझें लग्न करविलें होतें. पण एवढें बरीक चांगलें झालें होतें, कीं, आजीनें जें स्थळ शोधून काढलें होतें तें कांहीं सहज मिळण्याजोगें नव्हतें ! माझें माहेर आणि सासर एकाच गांवीं होतें. मीं लहानपणीं गांवीं असतांना दोनचार वेळांतरी सासरीं गेलें असेन. पण माझा सासरा कोण, सासू कोण, जावानणंदा कोण व मीं त्यांच्याशीं कसें वागलें पाहिजे, याबद्दल मला कांहींएक माहिती नव्हती, किंवा मी त्यांपैकीं कोणाएकासहि ओळखीत नव्हतें. मला त्या वेळीं यासंबंधाचें कांहींएक ज्ञान नव्हतें. लग्न झाल्यानंतर लवकरच पुनः आह्मी कलकत्त्यास गेलों. माझ्या बाबांस आतां पूर्वींपेक्षां पगारहि जास्त मिळूं लागला. त्यांचें बसणेंउठणें नेहमीं सुधारलेल्या बाबुलोकांत आणि साहेबलोकांत होऊं लागल्यामुळें व ते लोकहि वारंवार आमच्या येथें येतजात असल्यामुळें, हळुहळू आमच्या घरीं सुधारणादेवीचा प्रवेश होऊं लागला. आमचे कोंकणांतील रीतिरिवाज आणि आचारविचार सुटून त्यांत बराच फरक पडला. शिवाय, इकडे बाबांच्या माथ्यावर कोणी वडील माणूस नसल्यामुळें, व आप्तस्वकीयांचा धाकहि मुळींच नसल्यामुळें, आमचें घर हळुहळू साहेबी थाटाचें बनत चाललें. बसण्याउठण्यांत, जेवण्याखाण्यांत, पोषाखांत, तात्पर्य सर्व बाबतींत फरक होत चालला. घरांत खुर्च्या, टेबलें, कपाटें, आरसे, तसबिरी, बूट, स्टाकिंग्ज इत्यादिकांची रेलचेल उडाली व तें पाहून मला मोठा आनंद वाटूं लागला. मी घरींच आईच्या आणि बाबांच्या साह्यानें मराठी लिहावाचावयास शिकलें होतें व हिंदी शाळेंत चारपांच वर्षें जाऊन हिंदीचा आणि संस्कृताचाहि बराच अभ्यास केला होता; माझा हा अभ्यास पुरा होतांच बाबांनीं मला मिशनरीलोकांच्या

एका मुलींच्या शाळेंत घातलें. या ठिकाणीं सरासरी तीन वर्षें मीं इंग्रजीचा मन लावून अभ्यास केला. शाळेंत जातेवेळीं मी पायांत नाजुक बुट, अंगांत सफेत जाकीट, नेसावयास रेशमी साडी, असा पोशाख करीत असें. माझ्या बंगाली मैत्रिणीहि असेंच करीत. रमेशबाबूंची मुलगी सुरुची, लोकेशबाबूंची सरला व हरिबाबूंची हिरण्मयी ह्या माझ्या परम मैत्रिणी होत्या. त्याचप्रमाणें त्यांच्या कुटुंबांतील मंडळीचा व आमचा फारच घरोबा असे. माझा जन्म कलकत्त्यांतच झाल्यामुळें व वरील कुटुंबांतील स्त्रियांशीं आमच्या आईचा अतिशय स्नेह जडल्यामुळें, त्यांच्या आग्रहावरून माझ्या आईबापांनीं मला प्रियंवदा हें आवडीचें नांव ठेविलें व तेंच पुढें कायम राहिलें.

माझ्या एकंदर शिक्षणानें व मी नेहमीं जीं चांगलीं चांगलीं पुस्तकें वाचीत असें त्यायोगें, माझी धारणाशक्ति बरीच विकास पावली. मला आतां पति ह्मणजे काय, आपण त्याच्याशीं कसें वागलें पाहिजे, सासू कोण, नणंद कोण, त्याचप्रमाणें स्त्रीचें खरें सुख कशांत आहे, इत्यादि गोष्टी कळूं लागल्या. या वेळीं माझें वय सरासरी पंधरा वर्षांचें होतें. माझ्या कलकत्त्यांतील सोबतिणी नटून थटून सासरीं नेहमीं जातयेत, तें पाहून मीहि केव्हां एकदाची सासरीं जाईन, व माझ्या फॅशनेबल पोषाखानें आणि डाग-डागिन्यांनीं सासरच्या मंडळीचे डोळे कधीं दिपवीन, असें मला झालें होतें. ही माझी इच्छा लवकरच सफल होण्याचा रंग दिसूं लागला. बाबांस कलकत्त्याची हवा मानवेनाशी झाली. डाक्टरलोकांनीं त्यांनां थोडे दिवस तरी हवाबदल करण्यास सांगितलें, व आह्मी त्याप्रमाणें कोंकणांत आलों.

या ठिकाणीं माझ्या सासरची थोडीशी हकीगत सांगितली पाहिजे. मामंजींस रत्नागिरी जिल्ह्यांतच कोठेंशी मामलतदारीची नोकरी होती. तेहि नोकरीच्या निमित्तानें नेहमीं बाहेरगांवींच असत. घरांत माझी आजेसासू, सासू, मामंजी, दोन नणंदा, दोन जावा, त्यांचीं चारपांच मुलें, व तीन दीर आणि तिकडची स्वारी, एवढी मंडळी होती. मामंजी जरी मामलतदारीसारख्या मोठ्या कामगिरीवर होते, व त्यांनां पगारहि चांगला असे, तरीहि ते अगदीं जुन्या चालीचे गृहस्थ होते. सर्व रीतभात अगदीं जुन्या पद्धतीची. नवीन विचार आणि सुधारणा यांविषयीं सर्वांनां तिरस्कार वाटे.

एके दिवशीं संध्याकाळच्या वेळीं मी बाहेर ओटीवर कायसेंसें वाचीत बसलें होतें, आईहि घरांत कसल्याशा कामांत गुंतली होती, इतक्यांत एका शेजारणीनें येऊन सांगितलें "ऐकलं का उमाबाई! तुमची विहीण आज सकाळीं देवगडाहून आली आहे. माझ्यापाशीं तिनें तुह्माला निरोप सांगितला आहे, कीं, उद्यां सकाळीं सुनेला बोलवायला माणूस पाठविणार आहें ह्मणून."

माझी सासू वगैरे मंडळी आल्याची खबर समजतांच आईला फार समाधान झाल्यासारखें दिसलें. तिनें हास्यमुद्रा करून निरोप आणणाऱ्या बाईला विचारलें "अन् व्याह्मीहि आले आहेत का? नि मनोहर कधीं येणार?"

ती बाई ह्मणाली "रावसाहेबहि आले आहेत अन् मनोहर उद्यांच्या बोटीनं यायचे असल्याबद्दल पार्वतीबाई ह्मणत होत्या."

'सासूबाईकडून उद्यां बोलावणें येणार आहे' हे शब्द कानीं पडतांच कुसुम, काय सांगूं, मला जो आनंद झाला, तो सांगतां

येण्याजोगा नाहीं ! उद्यांचा दिवस केव्हां उजाडतो, असें मला झालें. सासूबाईकडून बोलावणें येणार हें ऐकतांच मला जो आनंद झाला होता, त्या आनंदापेक्षांहि कितीतरी अधिक आनंद दुसऱ्या दोन शब्दांनीं झाला होता, व त्या दोन शब्दांनीं खरोखर मला फारच अधीर करून सोडलें होतें. बेटा, तुला वाटत असेल, कीं, मला इतकी अधीर बनविणारे असे ते शब्द होते तरी कोणते ? आईनें निरोप आणणाऱ्या बाईस 'मनोहर कधीं येणार?' असा प्रश्न करतांच तिनें 'उद्यांच्या बोटीनें,' असें दिलेलें उत्तर, हेच ते शब्द होत. तूं ह्मणशील, कीं, या शब्दांनीं एवढी वेडी बनावयास मला काय झालें होतें ? पण कुसुम ! या संसारांत स्त्रीला सर्व सुखांमध्यें पति हेंच श्रेष्ठ सुख आहे. पति विद्वान् असो वा अविद्वान् असो, सुरूप असो वा कुरूप असो, श्रीमंत असो वा गरीब असो, पतीशिवाय स्त्रीला अन्य गति नाहीं. पति हाच स्त्रीचा देव होय ! ज्याप्रमाणें भगवद्भक्त परमेश्वराची मूर्ति मानतात, तिची पूजा करितात, अर्चा करितात, आणि तीच मूर्ति आपलें कल्याणकर्त्री व मोक्षदात्री आहे असें मानून तिची मनोभावानें आराधना करणें हाच आपला श्रेष्ठ धर्म होय असें समजतात; मग ती मानलेली मूर्ति सोन्याची असो, रुप्याची असो, पितळेची असो, अथवा दगडाची किंवा मातीचीहि असो; परंतु त्यांनीं मानिलेल्या मूर्तीवरील श्रद्धा हीच त्यांचें कल्याण करते, त्याप्रमाणें वर दर्शविलेले गुण अथवा अवगुणयुक्त पतीला देव मानून त्याची मनोभावें सेवा करणें, हाच पतिव्रता स्त्रीचा धर्म होय व हाच समज तिचें कल्याण करणारा आहे, असें मला माझ्या शिक्षणानें समजलें होतें व त्यामुळेंच वरील शब्दांनीं मला अधीर बनविलें होतें.

माझ्या कित्येक मैत्रिणींस, त्या आपल्या जिवलगांसहित बागे-मधून आणि नदीकिनाऱ्यावरून फिरत असतांना मी पहात असें व तें पाहून मलाहि असेंच सुख कधीं लाभेल अशी उत्कंठा मनांत उत्पन्न होई. माझ्या प्रियपतीचें मला रात्रंदिवस स्मरण होत असे, व कधीं एकदा त्याच्या दर्शनाचा लाभ घडेल, असें मला होऊन गेलें होतें. असो. सारी रात्र या आणि अशाच प्रकारच्या स्वप्नांत, अर्धवट झोंपेंत घालवून, दुसरे दिवशीं मोठ्या पहांटेस मी अंथरुणा-वरून उठलें. प्रातर्विधि, स्नान वगैरे उरकून घेतलें. कपाळावर कुंकुमाचा बारिक टिळा लावला, आणि कोणता शालू नेसून सासरीं जाऊं ? नारिंगी नेसूं, कीं गुलाबी नेसूं, कीं खाकी रंगाचा नेसूं ? अशा विचारांत कपाट उघडून ते शालू पुनःपुनः निरखून पहात आहें व हा पसंत करूं का हा करूं, अशा विचारांत माझें मन घुटमळत आहे, इतक्यांत घड्याळांत साडे सातांचा ठोका पडला व माझे धाकटे दीर दार उघडून आंत आले व "वहिनीला न्यायला आलों आहें," असा निरोप त्यांनीं माझ्या आईला सांगितला. माझी तयारी होतीच. आईचा निरोप घेऊन भावोजींबरोबर घरीं जावया-करितां मी आठ वाजतां माहेराहून निघालें.

बेटा, सासरीं प्रथमच जाते वेळच्या माझ्या पोषाखाचा थाट कसा होता, तें तुला सांगितलें पाहिजे. मी नारिंगी रंगाचा भरजरी शालू नेसलें होतें. अंगांत बर्फासारख्या शुभ्र रंगाचें कमानीचें आणि जागजागीं चुण्या असलेलें जाकीट घातलें होतें. 'लवेंडर'—सुवा-सिक पाण्यानें घमघमीत केलेला हातरुमाल उजव्या हातांत घेतला होता आणि डाव्या हातावर छत्री लोंबत ठेविली होती. दोन्ही हातांत एकेक सोन्याची बांगडी व दोन दोन कांचेच्या उंची

चांगल्या होत्या. गळ्यांत जाकीटावरून फक्त एकच हार घातला होता. उजव्या हाताच्या करांगुलींत हिरकणी बसविलेली आंगठी होती. कानांत कर्णलोलक होते. केश 'पोमॅटम्'—इंग्रजी मेण लावून चापून-चोपून बसविले होते. कपाळावर कुंकुवाचा बारिक टिळा लाविलेला होता. पायांत स्लीपर होते. अशा थाटानें मी माझ्या धाकट्या दिराबरोबर सासरीं आलें.

मी घरीं येतांच माझ्या सासूनें माझी ओंवाळणी वगैरे करून मजकडून उजवा पाय उंबरठ्यावर ठेववून माझा हात धरून मला आंत नेलें व माझ्या पाठीवर हात फिरवून प्रेमानें कुरवाळलें. घरांतील सगळ्या स्त्रिया या वेळीं जमल्या होत्या. परंतु त्यांतील एकीलादेखील मी ओळखीत नव्हतें. माझ्या दोन नणदांपैकीं धाकटी यमुना ही फारच बोलकी आणि विनोदी होती. सगळ्यांत पहिल्याप्रथम हिनेंच माझ्याशीं बोलण्याची सुरुवात केली. इतक्यांत माझी आजेसासू आली व मला आशीर्वाद देऊन माजघरांत घेऊन चालली. मला पाहून सर्वांनां आनंद झाला व सर्वांच्या प्रसन्न मुद्रा पाहून मलाहि अतिशयित आनंद झाला. त्या आनंदाच्या भरांत भान न राहिल्यामुळें ह्मणा, अगर माझ्या माहेरीं नेहमींचीच संवय असल्यामुळें ह्मणा, पायांतील स्लीपरांसकटच मी माजघरांत जाऊं लागलें. हें पाहून माझी आजेसासू ममतेच्या शब्दांनीं ह्मणाली "मुली, घरांत जोडे न्यायचे नाहींत; कोनांत काढून ठेव." आजेसासूचे हे शब्द ऐकून मी फार ओशाळलें व स्लीपर काढून ठेवून आंत गेलें.

माझ्या या नव्या घरची एकंदर व्यवस्था अगदीं जुन्या पद्धतीची होती. कलकत्त्यांतील आमच्या घराप्रमाणें या ठिकाणीं जमिनी-

वर चटया किंवा काथ्याचीं तरटें पसरलेलीं नव्हतीं. त्याचप्रमाणें बसावयासाठीं खुर्च्या किंवा कोचेंहि नव्हतीं. माजघरांतून मागील दारीं स्त्रियांच्या बैठकीच्या जागीं आह्मी सर्वजणी आलों. येथें येतांच सर्वजणी पटापट जमिनीवर बसल्या. पण माझा उंची शाल बिघडेल, जमिनीवर कसें बसावें, असा विचार करीत मी उभीच राहिलें. सासूबाईनीं दोनतीनदा मला बसावयास सांगितलें, परंतु मी आपली "होय, बसत्यें," असें ह्मणून उभीच राहिलें. त्यांनां वाटलें, कीं, ही भिडेनें उभी राहिली आहे. शेवटीं आजेसासू ह्मणाली "मुली, खालीं बस तूं. बसायला तें मेलं एवढं कशाला लाजलं पाहिजे! कुठवर उभी राहशील? बस खालीं." तिच्या या बोलण्यामुळें नाइलाज होऊन हातांतील रुमाल पसरून त्याजवर मी बसलें. हें पाहून माझ्या जावा व सासुबाई दुसरीकडे तोंड फिरवून गालांतल्यागालांत हांसल्या. पण यमुनाबाईच्यानें कोठलें स्वस्थ रहावयाला! तिनें खोंचून ह्मटलेंच "एवढ्याचसाठीं का वहिनी आपण इतका वेळ उभ्या राहिलां होतां? सांगितलं असतंत तर बसायला खुर्ची आणून दिली असती!"

परंतु आजेसासूनीं तिच्याकडे डोळे वटारून पहातांच ती पुढें कांहीं बोलली नाहीं.

## प्रकरण तिसरें.

## पहिली भेट.

शिष्टाचाराप्रमाणें माझ्या माहेरच्या मंडळीचें कुशल वगैरे विचारल्यावर आजेसासूंच्या आज्ञेवरून सगळ्याजणी आपापल्या कामास लागल्या. एकटी नणंद—यमुनाबाई—मात्र माझ्याजवळ राहिली. तिनें लवकरच, माझ्या जावा ह्या कोणाकोणाच्या मुली आहेत, त्यांचीं लग्नें कधीं झालीं, प्रत्येकीला मुलेंबाळें काय आहेत, वगैरे सर्व मला सांगितलें, व त्याचप्रमाणें दुसरीहि सासरसंबंधीं बरीच हकीगत सांगितली.

कुसुम, सासरीं पाय ठेवतांच पहिल्याप्रथम माझें चित्त ज्या गोष्टीनें ओढून घेतलें, ती तेथील स्त्रियांचा पोषाख ही होय! आज नवी सून येणार ह्मणून सगळ्याजणींनीं दररोजच्यापेक्षां उंची पोषाख केला होता; पण तो माझ्या आवडीच्या पोषाखाच्या अगदींच उलट, अर्थात् पूर्णपणें जुन्या पद्धतीचा होता. सुवासिनी स्त्रियांच्या हातांत कोंपरापर्यंत भरलेले चुडे होते. गळ्यांत टुशी वगैरे दागिने असून शिवाय हिरव्या, काळ्या पोतीचे जाड गळसर होते. कपाळावर कुंकवाचा भला मोठा टिळा होता! नेसावयास रेशमी कांठाचींच खरीं, पण जाडशीं लुगडीं होतीं. चोळ्याहि तशाच. नाकांतील नथी, आणि कानांतील त्या हिडीस बुगड्या पहातांच मला तर ओकारीच आली! पुरुषमंडळीचा

पोषाखहि असाच बेडौल होता. आमच्या बाबांच्यासारखी सफाई कोणाच्याच पोषाखांत नव्हती. तें पाहून माझा हा सुधारलेला पोषाख येथें कसा टिकणार, याची मला मोठीच काळजी उत्पन्न झाली व मी असंतुष्ट आणि निराश झालें.

लवकरच जेवणाची वेळ झाली. पुरुष मंडळी जेवून उठल्यावर आमचीं पानें मांडलीं. गोष्टींच्या तडाक्यांत केव्हांच जेवण उरकलें. थोरल्या जावेनें पत्रावळी कवळल्या, धाकटीनें उष्ट्यांस शेण लावलें, व नणंद खरकटीं भांडीं घांसण्याकरितां बाहेर घेऊन गेली. भांडीं उचलतांना माझी थट्टेखोर नणंद हंसतहंसत ह्मणाली "वहिनी! तुझीहि पाळी लवकरच येईल बरं का!"

हें ऐकतांच मी तर भेदरूनच गेलें. तथापि बाहेरून बळेंच हास्यमुद्रा दाखवून ह्मटलें "त्यांत काय आहे! आपल्या घरचं काम न करून कसें चालेल?"

माझ्या या भाषणावर सासूबाई ह्मणल्या "आजच त्याचं कांहीं अडलं नाहीं; सावकाश पहातां येईल."

सासूबाईंच्या या माझ्या तर्फेच्या भाषणानें कुसुम, माझ्या जीवांत जीव आल्यासारखें मला झालें! खरोखर तुला सांगतें, नणंदेनें 'तुझीहि पाळी येणार' असें सांगतांच माझी कम्मर एकदम खचल्यासारखें मला झालें होतें. कारण, खरकटीं भांडीं घांसणें, उष्टीं कवळणें, शेण लावणें, पाणी भरणें, असलीं कामें माहेरीं मीं आजपर्यंत कधींहि केलीं नव्हतीं, व माझी आईहि कधींकाळीं वेळप्रसंग पडला तरच करीत असे. या कामासाठीं आमच्या घरीं बाई असे. मला तर असल्या कामांचा फार वीट येई व हीं कामें करणें हें अगदींच हलक्या प्रतीचें वाटे. परंतु येथील प्रकार निराळाच

होता. एकीनें आठ दिवस पाणी भरावयाचें तर एकीनें सैंपाक करावयाचा, एकीनें खरकटीं भांडीं घांसावयाचीं तर एकीनें केरपोतेरें करावयाचें, अशीं घरांतील सगळीं कामें वांटून दिलेलीं होतीं. अमुक काम अमकीनेंच करावयाचें हें पूर्वीं ठरलेलें असल्या-मुळें कामांचा मुळींच गोंधळ होत नसे व आपल्यावरच सर्व काम पडतें अशी कोणाची कुरकुरहि पण रहात नसे. कारण, आळी-पाळीनें सगळ्याजणींनां सगळींच कामें करावीं लागत. माझ्या वयोवृद्ध आजेसासू मोठ्या दक्ष होत्या व त्यांनींच घरांत अशी चोख व्यवस्था घालून दिलेली होती. मुलींनां, नातींनां बसवून ठेवावें, आणि सुनांच्या डोकीवरच सर्व कामें लादावीं, असा पक्षपात त्यांनीं ठेविला नव्हता. त्या ह्मणत असत "बायकोचा जन्म आहे. खायाप्यायाला यथेच्छ घालावें, पण पुजून ठेवूं नये. कामासच लावल्या पाहिजेत !"

असो. उष्टींखरकटीं आटोपल्यावर सासूबाईनीं लेंकरांनां आंचवूं घालून व त्यांचें अंग पुसून त्यांनां माडीवर नेऊन निजविलें. इतका प्रकार उरकेपर्यंत चांगला एक दीड झाला. सर्वांचीं कामें आटोपलीं व सगळ्याजणी पुन्हा मागील दालनांत जमल्या. इतक्यांत आजेसासूहि निजून उठल्या व त्यांनीं डाळतांदूळ निवड-ण्याची आह्मां सर्वांनां आज्ञा केली. आमच्या आजेसासूंच्या हुकुमानें हें आमचें छोटें राज्य सुरळीतपणें चाललें होतें. कपड्यांमध्यें, आचारविचारांमध्यें माझें सुधारलेलें मन जरी पहिल्या देखाव्याबरोबर विटलें होतें, तरीहि येथील टापटीप, शिस्त आणि समाधान पाहून मी आश्चर्यांत दंग झालें.

हांहां ह्मणतां चार साडेचार झाले. आजेसासू देवळांत पुराण ऐकावयाला गेल्या. सासूबाई मुकटा नेसून सैंपाकाच्या तयारीला

लागल्या. थोरली जाऊ त्यांनां मदत करूं लागली. हें पाहून मींहि त्यांनां कांहींतरी मदत करावी ह्मणून "मला कांहीं काम सांगा," असें ह्मटलें. परंतु सासूबाई ह्मणाल्या "आतां तुलाच करायचं आहे सगळं, पण आजच नको कांहीं. बाहेर यमूबरोबर गोष्टी बोलत बस जा."

कुसुम ! माझ्या प्रेमळ सासूसारखी सासू साऱ्यांनां मिळो, असें देवापाशीं मागणें मागतें. खरोखर, त्या माउलीची आठवण होतांच हृदय भरून येतें !

याप्रमाणें माझा पहिला दिवस गेला. दुसरा, तिसरा व पुढीलहि असेच गेले. आमच्या घरची चोख व्यवस्था पाहून माझें अंतः-करण प्रसन्न झालें. तथापि एकच शल्य माझ्या हृदयांत रात्रंदिवस सलत होतें, आणि तें पोषाखासंबंधाचेंच होय ! सासरींहि अजून-पर्यंत माझा पूर्वींचाच—जो मला अत्यंत प्रिय होता—पोषाख होता व त्यासंबंधीं मनांतून जरी सर्वांनां तिटकारा वाटत असल्याचें त्यांच्या मुद्रेवरून व केव्हां केव्हां माझ्या अपरोक्ष त्यांच्यामध्यें होत असलेल्या कुजबुजीवरून माझ्या लक्ष्यांत येऊन चुकलें होतें, तरीहि उघडपणें यासंबंधीं मजपाशीं कोणींहि अवाक्षरसुद्धां उच्चारिलें नव्हतें; परंतु माझ्या आवडत्या पोषाखाचा त्याग करण्याचा प्रसंग लवकरच प्राप्त होणार, हें मी पक्कें जाणून चुकलें होतें व त्यासाठीं मनांतल्या मनांत एकसारखी झुरत होतें.

आठपंधरा दिवस लोटल्यावर माझ्या आजेसासूंनीं एक दिवस सुमुहूर्त पाहून माझा सोहळा करविला. धर्मविधीप्रमाणें होमहवनादि सर्व संस्कार उरकले. रात्रीचें जेवणखाणहि झालें. नवांचा सुमार होतांच माझ्या नणंदेनें फुलांच्या हारतुऱ्यांनीं भरलेलें ताट माझ्या-कडे देऊन मला अंतःपुरांत जावयास सांगितलें.

नणंदेच्या आज्ञेवरून ताट घेऊन भीतभीत मी एकदाची आंत गेलें. तिकडे संभाषण करण्याविषयीं माझें मन कितीतरी उत्कंठित झालें होतें, व कधीं एकदा तिकडच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ घडेल व आपलें हृद्गत तिकडे कळवून तिकडचें काय आहे तें मी समजून घेईन, अशी मनाला सारखी चुटपुट लागून राहिलेली होती. पण बेटा, खोलींत नुसता पाय ठेविला मात्र तोंच माझी अवस्था कशीच्या कशीच झाली ! पाय लटलट कांपूं लागले, छाती मोठ्या वेगानें धडकूं लागली व तोंडांतून अक्षरच निघेना ! मी आपली लाजून भिंतीशीं तोंड करून स्तब्ध उभी राहिलें. माझी ही स्थिति पहातांच जवळ येऊन माझ्या पाठीवरून हात फिरवून "वः, एवढें शिकूनसवरून शेवटीं असें वेड्यासारखें घाबरूनच का जायचें?" असें विनोदानें ह्मणणें झालें. तिकडच्या या भाषणानें ह्मण किंवा हळूहळू भीति कमी झाल्यामुळें ह्मण, मला थोडासा धीर वाटून बरोबर आणलेला हार मीं गळ्यांत घातला आणि "मी आपल्या सुखदुःखाची वांटेकरीण आहें. माझ्या खऱ्या सुखाचे स्तंभ आपणच आहां," इत्यादि शब्द कांपतकांपत बोललें व हात जोडून खालीं मान करून उभी राहिलें. तिकडून हास्यमुखानें आश्वासन देऊन आपल्याजवळ पलंगावर मला बसविलें, आणि माझा कोठपर्यंत अभ्यास वगैरे झाला आहे, व मीं आजपर्यंत कोणकोणतीं पुस्तकें वाचलीं आहेत, वगैरेसंबंधीं मोठ्या कौतुकानें मला प्रश्न केला. मीं मला येत होतें तेवढें निवेदन केलें व तें ऐकून तिकडे मोठा आनंद झाल्यासारखें दिसलें.

आमच्या या अंतःपुरामध्यें जिकडेतिकडे सरस्वतीचेंच राज्य मला दिसून आलें. मोठमोठालीं इंग्रजी पुस्तकें सर्वत्र पसरलीं होतीं.

तथापि या ठिकाणीं टेबलखुर्च्या वगैरे कांहींएक नसून एक बैठें टेबल होतें व ग्यासलेटच्या किंवा मेणबत्तीच्या चिमणीच्या दिव्या-ऐवजीं तिळाच्या तेलानें भरलेली स्वच्छ समई लाविलेली होती. तिकडला एल्. एल्. बी. चा अभ्यास चालला होता व नेहमीं रहाणें मुंबईतच असे; तेव्हां निदान अभ्यासाच्या खोलींत तरी टेबल, खुर्च्या असतील, असा माझा तर्क होता; पण तो आज नाहींसा झाला. येथें एकंदर प्रकार जुन्या पद्धतीचाच दिसला. असो.

आह्मांला या प्रथम भेटीपासून फार आनंद झाला. त्या आनंदाच्या भरांत गोष्टी बोलतांबोलतां बरीच रात्र लोटली व आह्मी निद्रावश झालों. पहांटेस चार वाजतां कोंबडा आरवण्याबरोबर मी उठलें आणि खालीं येऊन गृहकृत्यांत पडलें. याप्रमाणें आमचे बरेच दिवस गेले.

## प्रकरण चवथें.

# आजेसासूंचा उपदेश.

एक दिवस जेवणखाण आटोपल्यावर आह्मी सर्वजणी नित्याप्रमाणें ओटीवर डाळतांदूळ निवडीत गोष्टी बोलत बसलों होतों, इतक्यांत आमच्या बाबांकडील रामा गडी 'माझी आई अंग तापून आल्यामुळें एकदोन दिवस किंचित् आजारी आहे व तिनें मला सासूबाईंची परवानगी घेऊन आजच माहेरीं बोलाविलें आहे,' असा निरोप घेऊन आला. अर्थात्, सगळ्यांचा निरोप घेऊन मी माहेरीं जाण्याला तयार झालें. पण आजेसासूंकडून अद्याप आज्ञा घ्यावयाची होती. त्या माडीवरल्या दिवाणखान्यांत मामंजींशीं गोष्टी बोलत बसल्या होत्या. तेथें जाऊन बोलावें कसें, हें मला एक मोठें गूढ पडलें. इतक्यांत माझी नणंद ह्मणाली "वहिनी ! कसल्या विचारांत पडली आहेस ? चल, तुला आजीकडून निरोप देववित्यें."

गेलें बाई कांपतकांपत वर. तेथें जातांच नणंद ह्मणाली "आजी, वहिनी तुझा निरोप घ्यायला आली आहे."

यमुनाबाईंचें हें भाषण ऐकतांच "येऊं दे वर, इथें लाज कुणाची?" असें बोलून आजेसासू मामंजींकडे वळून ह्मणाल्या "सूनबाई आज माहेरीं जात आहे. तिची आई ह्मणे आजारी आहे, तेव्हां आठ दिवस परत येणार नाहीं."

"जाऊं दे; आईची तब्यत बरोबर नसली तर काय करील बिचारी?" याप्रमाणें त्यांचें बोलणें होत आहे, इतक्यांत मी आजेसासूंच्या आणि मामंजींच्या अगदीं जवळ जाऊन त्यांनां नमस्कार करून "मीं येत्यें," असें भीतभीत ह्मटलें. त्याबरोबर माझ्या आजेसासू ह्मणाल्या "ये बरं बाळ, तूं सदा सुखी रहा, हाच माझा तुला आशीर्वाद आहे. मुली, तूं शहाणी आहेस, शिकलीसवरलेली आहेस, आणि समजुतदारहि आहेस, तरीहि तुला माझ्या मनांतून दोन शब्द सांगायचे आहेत. मात्र त्याबद्दल तुला वाईट वाटूं देऊं नकोस ! कारण, ज्याला कोणीं त्याच्या हिताचं कांहीं सांगितलं असतां तें रुचत नाहीं, त्याचं तहूं संसारांत कधींहि पुढं चालायचं नाहीं. देव तुला चांगली बुद्धि देवो, आणि तुला हमेश सुखी ठेवो." असें ह्मणून त्यांनीं मला पोटाशीं घेतलें, आणि माझ्या तोंडावरून हात फिरवून पुढीलप्रमाणें मला उपदेश केला:—

"स्त्रीचं खरं घर तिचं सासरच आहे. माहेरीं कितीहि जरी धनदौलत असली, तरी ती व्यर्थ होय ! आईबाप जिवंत असेपर्यंत मुलींनां माहेर हें आपलंच घर आहे असं वाटतं खरं, परंतु तें फक्त तीं असेपर्यंतच ! मागाहून भाऊभावजया विचारीतदिखील नाहींत. मुली, तूं नेहमीं तुझ्या सासरचाच अभिमान धर आणि तुझं सौभाग्य अखंड राहो ! हो बरी आठवण झाली, तूं जो हा वेडाविद्रा पोषाख करीत असत्येस, अन् बसल्याउठल्या सारा दिवस हातांत हातरुमाल घेतेस तो न घेतला आणि बुट वगैर मुळींच नाहीं घातले, तर लोक तुला तूं कुणी गरीब कुटुंबांतली आहेस असं समजणार नाहींत. शिवाय, ज्या ठिकाणीं जें शोभेल त्या ठिकाणीं तें केलं पाहिजे. पोरपणामधें आईबाप प्रेमामुळं आपल्या

लेंकरांचे सगळे लाड पुरवितात आणि तें त्या वेळीं शोभूनहि पण जातं. परंतु आतां तूं मोठी झाली आहेस, यासाठीं आतां तुला पोरपणांतल्या गोष्टी सोडून देऊन जाणत्या बायकोला शोभेल अशा रीतीनंच वागलं पाहिजे. माझं काय, दस गेले पांच राहिले ! मला माझं आयुष्य आतां तुझ्याबरोबर थोडंच काढायचं आहे ! पिकलं पान कधीं झडेल याचा नेम नाहीं. पण बाईग ! लोकांनीं आपल्याला नांवं ठेवावीं असं आपलं आचरण कधींहि ठेवूं नये. तीच पाहीनास त्या माधवराव मुन्सफांची मुलगी शांता, सारा दिवस आपल्या पोषाखाच्या नखऱ्यांतच चूर असते ! दिवसांतून तिला सात साड्या लागतात ! हें चांगलं का दिसतं ? तोंडावर कुणी बोलत नाहींत; पण अपरोक्ष निंदा करीत असतात. तुला मी हें तुझ्या भल्याचं सांगत आहें, वाईट वाटून घेऊं नकोस. तूंच विचार कर, तुझ्या सासऱ्यानं सर्वांनां नेसण्या-पांघरण्याला अंगभर वस्त्रं दिलीं आहेत; बायकामाणसांची मर्यादा राहील अशाच प्रकारचीं वस्त्रं, देवानं त्याला दिलेल्या सामर्थ्या-प्रमाणं त्यानं सगळ्याजणींस दिलीं आहेत व तो पुढं देईल; आणि त्यांत सर्वजणी सुखी आहेत. मुली, तूंहि तशीच वागून आपल्या घराची शोभा वाढीव, असं तुला माझं म्हातारीचं सांगणं आहे. तुझ्या मुखचर्येवरून आणि तुझ्या एकंदर चालचलणुकीवरून मला दिसत आहे, कीं, माझ्या सगळ्या नातसुनांमध्यें तूंच विशेष चलाख आणि शहाणी आहेस. तो माझा समज तूं खरा करून दाखीव, आणि तूं सुखी हो व बाकीच्या मंडळीसहि सुखी कर. तूं हमेश सुखी रहा, हाच माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे. ये बरं बाळ, उशीर फार झाला. आतां वेळ लावूं नको. पण मीं सांगितलं याचा

नीट विचार कर बरं. ये आतां." असें ह्मणून त्यांनीं मला निरोप दिला.

इतक्यांत माझी नणंद ह्मणाली "वहिनी! तूं जी टांचणीनं कुंकवाची टिकली लावित्येस ती जरा मोठी लावीनास, आणि सारा दिवस नाक जें उघडं सुटसुटीत ठेवित्येस तें कांहीं बाई मला बरं दिसत नाहीं! नाकामध्यें नथ ही पाहिजे!"

यावर मामंजींनीं ह्मटलें "आतां तिला माहेरीं जाऊं दे. उशीर झाला. हळुहळू तिचें तिलाच समजूं लागेल."

एवढें झाल्यावर सर्वांचा निरोप घेऊन खिन्न मुद्रेनें मी माहेरीं निघून गेलें.

## प्रकरण पांचवें.

# भूत जाचतें.

कुसुम! आजेसासूंचा निरोप घेऊन मी माहेरीं आलें खरी, पण त्यांनीं मामंजींसमोर केलेल्या उपदेशानें व नणंदेच्या त्या टोमण्यानें माझ्या अंत:करणाचें आंतल्याआंत जळून भस्म होऊन गेलें. रस्ताभर आणि पुढें माहेरीं आल्यावरहि माझ्या अंत:करणामध्यें याच दु:खद विचारांनीं काहूर उठवून दिलें होतें. ज्या माझ्या सुधारलेल्या पोषाखाच्या नीटनेटकेपणासाठीं मी तहानभुकेलासुद्धां कैक प्रसंगीं जुमानलें नाहीं, तो आतां मला निरंतरचा अंतरणार आहे, व तो प्रसंग अगदीं नजीक येऊन ठेपला आहे, इत्यादि विचार मनांत येऊन मी एकसारखी झुरणीस लागलें. मला अन्न-पाणी गोड लागेनासें झालें व पोषाखासंबंधीं मला हृद्रोग लागला ह्मटलें तरी चालेल. बेटा! आईबापांच्या कृपेमुळें आजपर्यंत दु:ख ह्मणजे काय असतें व चिंता कशाला ह्मणतात, हें मला मुळींच ठाऊक नसल्यामुळें या लहानशाच धक्क्यानें माझ्या नाजूक शरीर-प्रकृतीवर आपला चमत्कारिक परिणाम केला. एका आठवड्याच्या आंतच मी अर्धी होऊन गेलें व माझ्या शरीरांत जीर्णज्वरानें प्रवेश केला. सासरहून येऊन पुरते पंधराहि दिवस झाले नाहींत तोंच मी अंथरुण धरिलें व दिवसेंदिवस माझी प्रकृति अधिकाधिक क्षीण होत चालली. माझ्या बाबांचें मजवर अतिशय प्रेम असल्यामुळें ते फार घाबरून गेले व माझ्या औषधपाण्याची

फार काळजी घेऊं लागले. पहिल्यानें मला गोविंदपंतांचें औषध चालविलें. त्यानें कांहीं गुण दिसेना ह्मणून अबदुल्लासाहेबांचें सुरू केलें व अखेरीस रामभाऊ डाक्टरांचें लागू पडतांच त्यांचेंच चालू ठेविलें. माझ्या मानसिक चिंतेनें मला अगदीं अशक्त करून सोडलें होतें. मी इतकी अशक्त झालें होतें, कीं, दुसऱ्या कोणीं हातास धरून उठविल्याखेरीज मला अंथरुणावरून उठतांदेखील येत नव्हतें; मग अर्ध घटका बसण्याची गोष्ट दूरच राहिली! माझ्या या दुखण्याची हकीगत माझ्या घरीं कळतांच माझ्या सासूबाई, मामंजी वगैरे मंडळी एकदोन दिवसांआड माझ्या समाचाराला येऊं लागली. माझ्या आजेसासूहि एक दिवस मला पाहण्याकरितां मुद्दाम आल्या होत्या. माझी त्या वेळची ती दशा पाहून त्या ह्मणाल्या "इतक्या थोड्या वेळांत तूं इतकी झुरलीस! तुला ग पोरीला एवढी कसली चिंता लागली?"

याप्रमाणें बोलत व माझ्या पाठीवरून हात फिरवीत फिरवीत त्या आईला ह्मणाल्या "कुणाचं औषध चालू आहे? दाक्तर दररोज येत असतो, का नुसती हकीकत कळवूनच औषध आणवितां? मेल्या दाक्तरांनां काय समजतं. त्या मेल्यांनां का आमच्या वैद्यांची सर येईल? ते नारायणराव मोठे अनुभविक आहेत हो! काय सांगूं त्यांची शक्ति! अहो, नुसती नाडी पाहिल्याबरोबर ते अमूक पदार्थ खाल्ल्याचं सांगून देतात! आह्मी नेहमीं त्यांचंच औषध घेत असतों, आणि त्यांच्या हाताला देवानं यशहि पण तसंच ठेविलं आहे! तुह्मी आपलं इला त्यांचंच औषध सुरू करा, माझं एवढं ऐकाच तुह्मी! का मीच त्यांनां इकडे पाठवून देऊं?" इत्यादि प्रकारें बोलून बराच वेळ बसून नंतर त्या निघून गेल्या.

रामभाऊ डाक्टरांच्या औषधानें माझा ताप हटला, तथापि अशक्तता अद्यापि राहिलीच होती. डाक्टर रोज सांगत असत, कीं, मनाच्या व्याधीमुळें शरीराची अशक्तता वाढत असते, यास्तव दुखण्यामध्यें आजारी मनुष्यानें कसलीहि चिंता करतां कामा नये.

हळुहळू माझ्या या दुखण्याची हकीगत माझ्या आजोळींहि पोहोंचली. माझ्या आईच्या आईच्या, अर्थात् माझ्या आजीच्या कानीं ही बातमी पडतांच ती म्हातारी धापा टाकीत तशीच धांवत आली. माझी आजी बिचारी अगदीं जुन्या विचारांची बायको होती. मी सासरीं महिनापंधरा दिवस राहून येऊन आजारी पडलें आहें, हें तिला समजतांच ती अतिशय घाबरली व सर्वांनां सांगूं लागली, कीं, "ही कां आजारी पडली, तें तुह्मांला समजलं का? इच्या दुखण्याचं दुसरं कांहींएक कारण नसून इची चुलत जाऊ बाळंतपणामधें मेली आहे नव्हे का, ती बया भूत होऊन इला जाचीत आहे! पोरीला ग्रासलीन सटवीनं! तुमचं तें औषधपाणी कांहींएक उपयोगी पडायचं नाहीं. अगोदर इचं भूत काढलं पाहिजे!"

आजीचें हें वेडगळपणाचें भाषण ऐकून बाबा जरा रागानें ह्मणाले "बरें आहे! भूतानें मुलीला पछाडलेलें नाहीं, पण तुह्मां अडाणी बायकांनांच त्यानें ग्रासून टाकिलें आहे. भुतेंखेतें सब झूट आहे! माणूस मेलें ह्मणजे त्याचें दहन करितात. त्याच्या प्रेताचें जळून भस्म होतें, व राख मातीशीं मिळून जाते. त्याचा मागें कांहींएक संबंध राहत नसतो व तें बिचारें कोणाएकासहि जाचित नसतें. तुमच्यासारख्या भोळ्या माणसांनां ठकविण्याकरितांच ढोंगी लोकांनीं भूतेंखेतें उपस्थित केलेलीं आहेत. तुह्मां बायकांनांच भूत छळित असतें. पुरुषांच्या नाहीं कधीं वाटेस जात तें?"

यावर माझी आजी ह्मणाली "तुह्मी अलीकडचे लोक, ती मेली विंगुरजी कीं फिंगुरजी झाल्यापासून सगळंच आपलं खोटं मानूं लागलां आहां! तुह्मीं कसलाच धरबंद ठेविला नाहीं. पण मी नाहींहो तुमचं हें ह्मणणं खरं मानायची? भूतांचे खेळ या माझ्या डोळ्यांनीं मीं प्रत्यक्ष पाहिलेले आहेत. दुसऱ्यांचं उदाहरण कशाला! खुद्द आमच्याच घरीं भूत होतं व किती वर्षंतरी आह्मांला तें जाचीत असे. पण त्याला नारळ कोंबडा देऊं करून सहस्रभोजन घातल्या दिवसापासून आतां त्याची फारशी बाधा होत नाहीं."

"तुह्मी ह्मणतां तें खोटें नव्हे; पण तें भूत नव्हे. तुमच्या घरांत आठचार दिवशीं कोणीना कोणी आजारी पडत असे त्याचें कारण भूत नसून तुमच्या घरामध्येंच तशीं कांहींतरी चमत्कारिक कारणें होतीं, असें मला वाटतें. घरांत ओलबील असेल, मागच्या दारीं किंवा पुढच्या दारीं घाण सांचली असेल, कोनाकोपऱ्यांत उकिरड्याचे ढीग झाले असतील, व याच प्रकारच्या दुसऱ्या कांहीं कारणांमुळें हवा बिघडून जाऊन सर्वजणें लागोपाठ आजारी पडत असावीं, असें मला वाटतें."

यावर माझी आई ह्मणाली "खरंच आई, आपल्या मागील दारीं तर उकिरड्याचा मोठा थोरला ढीग पडला आहे. आणि मुलंबाळं तर आवारांतच घाण करीत असतात—"

"खूळ लागलं आहे तुला!" माझी आजी ह्मणाली. "अग वेडे, अशी घाण आपल्याच का एकट्याच्या दारासमोर आहे? साऱ्या गांवांत अशीच वहिवाट आहे. परंतु साऱ्यांच्याच घरीं नाहीं कधीं सारीं माणसं दुखण्यानं पडलीं तीं! आणि ती लक्ष्मी मोठ-

मोठ्यानं ओरडत असे, पुरुषांच्या देखतहि नाचत असे, तेंहि खोटंच का ?"

आई ह्मणाली "पण तें भूत नव्हे! तो एक जातीचा वायु आहे. त्याला डाक्तरलोक हिस्टिरिया असं ह्मणतात, आणि तो विशेषेंकरून बायकांनांच होतो. त्या हिस्टिरिया वायूच्या योगानं मनुष्य उगीचच्या उगीच एकसारखं हंसत सुटतं, कारण नसतांहि मोठमोठ्यानं ओरडतं, अंग ताठतं व दुसरेहि कित्येक चाळे करतं, आणि यालाच आपल्या अडाणी बायका भूतांची बाधा झाली असं समजतात! त्या आपल्या रमाबाईची मुलगी यमुना सोळा वर्षांची आहे नव्हे का—ती ग त्या पुणेंकरांच्या इथें दिली आहे ती, तिला आठचार दिवशीं असंच होत असतं. तुला दाखवीन उद्यां, ह्मणजे तुझी खात्री होईल. तो एक रोगच आहे. भूत नाहीं नि खेत नाहीं!"

"तें कायतें तुह्मांला ठाऊक! मला आपलं खुळीला वाटलं होतं, कीं, कोणा पंचाक्षऱ्याला बोलावून आणून तावीजदोरा बांधून घ्यावा."

यावर बाबा ह्मणाले "तुमच्यासारखीं माणसें दुनयेंत नसतीं तर बापडे तावीजदोरा बांधणारे पंचाक्षरी उपाशींच मेले असते! अमक्या देवाला कोंबडा द्या, अमुक झाडाखालीं लिंबू कापून टाका, अमुक ब्राह्मणांची समाराधना घाला, इत्यादि सांगून हे लुच्चे लोक भोळ्याभाबड्या लोकांनां फसवून पोटें भरीत असतात. उद्योग केल्याविना जर पोटाची सोय होते तर त्यांनीं अशीं ढोंगें कां करूं नयेत? मोठमोठे शहाणेसुर्ते ह्मणविणारे कित्येक पुरुषहि ज्यापक्षीं या भोंदू लोकांच्या थापांनां भुलून जातात, त्यापक्षीं तुह्मी बायका त्यांच्या नादीं लागलां तर नवल काय? पण असल्या लुच्च्या

लोकांवर याउपर तुह्मी मुळींच विश्वास ठेवूं नका. तुह्मी पडलां भोळ्या, जवळपास असेल नसेल तें हे लोक लुबाडून न्यावयाचे!"

आजीनें विचारलें "मग कुणी कुणी डोकींतील जटेंतून किंवा हातांतून गंगा काढून दाखवितात तेंहि खोटंच वाटतं?"

"अलबत खोटें! तें सगळें ढोंग आहे! ती एक प्रकारची हातचलाखी आहे. हजारों ठक अशा भलभलत्या हातचलाखीच्या प्रयोगांनीं असंख्य भोळ्या माणसांनां ठकवीत असतात!"

यावर आजी चूप बसली, कांहीं बोलली नाहीं. मला डाक्टरच्येंच औषध चालू ठेवण्यांत आलें. हळुहळू दोन महिने लोटले तशी माझी तब्यत जराजरा सुधरत चालली.

प्रकरण सहावें.

## स्त्रीपार्लमेंट !

आमच्या घरची एकंदर रीतभात अगदीं जुन्या पद्धतीची व तीहि कित्ता घेण्याजोगी होती; तथापिहि त्याबरोबरच कित्येक अडाणी प्रकारहि आमचे घरीं राजरोस चालू होते, हें मला येथें उघडपणें सांगितलें पाहिजे. आणि त्यांत या स्त्रीपार्लमेंटाचा नंबर पहिला होता. घरचें कामकाज आटोपल्यावर थोडासा फुरसतीचा वेळ सांपडला, कीं, घरांतील बायका व बाहेरील दहापांच शेजारणी-पाजारणी एकत्र जमून आज काय अमक्याच्या येथें अमुक झालें, तमक्याच्या सुनेला यंदा सोळावें वर्ष चाललें असून अजून तिला न्हाणच आलें नाहीं. ती रमाबाई निऱ्याच अशा काढते, कमळा-बाईच्या नथीचीं मोत्यें खोटींच आहेत, राधाबाई कुंकूंच बारीक लावते, ह्या आणि अशाच प्रकारच्या गोष्टी करीत कालक्षेप करित असत. या त्यांच्या बैठकींस तिकडून थट्टेनें 'स्त्रीपार्लमेंट' असें नांव देण्यांत आलेलें होतें.

त्या तरी काय करतील बिचाऱ्या ! त्यांनां जर लिहितांवाचतां आलें असतें तर आपल्या ह्या फुरसतीच्या वेळाचा चांगलीं चांगलीं उपदेशपर व ज्ञानप्रद पुस्तकें वाचण्यांत त्यांनां उपयोग करतां आला असता व त्यापासून त्यांचें स्वतःचें मनोरंजन आणि ज्ञानार्जन होऊन त्यांच्या मैत्रिणींसहि त्यांजकडून सदुपदेशप्राप्ति झाली असती. परंतु बायकांनीं लिहिण्यावाचण्यास शिकणें हें मोठें पाप आहे

असा समज असलेल्या घरांत, अशीं स्त्रीपार्लमेंटें भरून शेजाऱ्या-पाजाऱ्यांच्या व्यंगांचें वर्णन आणि टीका व्हावी व केव्हांकेव्हां त्यापासून पुढें आपापसांत भयंकर रणकंदनें माजावीं, ह्यांत कांहींच नवल नाहीं. तसें न झालें तर मात्र नवल खरें! बायकांस जर सुशिक्षण मिळेल तर शेजाऱ्यापाजाऱ्यांतील वैमनस्याचा—कारणाविना उपस्थित होणाऱ्या वैमनस्याचा—समूळ लोप होईल, हें मी खात्रीनें सांगतें. शिक्षणापासून एवढाच काय तो एक फायदा आहे, असें तूं समजूं नको. शिक्षणाची योग्यता समजलेल्यांनां त्याची पुरती आवश्यकता कळून आली आहे. 'राष्ट्राचा उदय होण्याला, राष्ट्रांतील माता—स्त्रिया—सुशिक्षित झाल्या पाहिजेत!' हें प्रख्यात नेपोलियन बोनापार्टाचें वाक्य तूं वाचलेंच असशील. हळुहळू आपल्या लोकांनां स्त्रीशिक्षणाची आवश्यकता आणि महती कळूं लागली आहे, हें मोठ्या भाग्याचें लक्षण होय असें मी समजतें. असो.

वर सांगितलेल्या स्त्रीपार्लमेंटाच्या बैठका आठवड्यांतून तीन-चार वेळां तरी भरत असत. सासरीं असतांना ह्या पार्लमेंटाच्या चारपांच बैठका मीं प्रत्यक्ष पाहिल्या होत्या. रामा गडी मला बोलवावयाला आला होता त्या दिवशीं, मी माहेरीं निघून गेल्यावर या पार्लमेंटाची एक स्पेशल मीटिंग भरली होती. ही हकीगत मला तिकडून मागाहून पुष्कळ दिवसांनीं ह्मणजे सरासरी एका वर्षानंतर समजली. या दिवशीं या सभेंत एकंदर अकरा सभासद हजर होते. पांच घरचे आणि सहा बाहेरचे. प्रेसिडेंटा (अध्यक्षा) च्या जागीं माझे दीर ( तिकडील चुलतभाऊ ) सदोबा—जे म्युन्सिपालिटींत पंधरा रुपये दरमहावर नाकेदार होते ते—विराजमान झाले होते. सभासदांमध्यें माझ्या सासुबाई, दोघी नणंदा,

थोरली जाऊ ही घरची, आणि ठमाबाई, उमाबाई, यशोदाबाई, सगुणाबाई, लक्ष्मीबाई आणि यमुनाबाई ही शेजारची मंडळी होती. मामंजी बाहेर कुठेंसे गेले होते. आजेसासू देवळांत पुराणाला गेल्या होत्या. तिकडून माडीवरल्या खोलींत वाचीत बसणें झालें होतें, व ओट्यावर पार्लमेंटचें काम सपाट्यानें आणि जोरांत चाललें होतें. चर्चेचा विषय नव्या सुने—माझ्या—बद्दलचा होता.

ठमाबाई ह्मणाली "कायहो पार्वतीबाई! तुमच्या नव्या सुनेचं आचरण असं काय तें? तुह्माला राग येईल ह्मणून बाई नाहीं बोलल्यें; पण गृहस्थांच्या मुलींनां असे ढंग नि असे रंग नाहीं बाई शोभत!"

यावर उमाबाई ह्मणाल्या "खरंच! मला तर पहिल्यानदा असंच वाटलं होतं, कीं, कुणी आपली अशीतशीच बाई आपल्या वाडींत येत आहे! परंतु जेव्हां यांच्या गणपतीला (हें माझ्या धाकट्या दिराचें नांव होतें.) बरोबर पाहिला, व सगुणाबाई ह्मणाल्या, कीं, पार्वतीबाईंची सून आज माहेरून यायची आहे, तेव्हां ओळखलं, कीं, ही आपल्या मनोहराची बायको असावी."

सगुणाबाई ह्मणतात "कायतरी बाई तो तिचा पोषाखाचा थाट! अंगांत तें चिंध्या चिंध्या जोडून शिवलेलं जाकीट कीं फाकीट काय ह्मणतात तें, हातांत हातरुमाल, पायांत बूट, इश्शग बाई! आपल्याला नाहीं हें बरं वाटत!"

सासूबाई ह्मणाल्या "अहो जरा अल्लड आहे ती! पायांतल्या बुटांनिशींच माजघरांत जात होती. पण सासूबाईंनीं जोडा काढ ह्मणून सांगितलं तेव्हां आंबट तोंड करून आंत आली. पोरच कीं नाहीं किती झालं तरी!"

यावर सदोबा भावोजी ह्मणाले "बापाच्या घरीं सैंपाकघरांतहि जोड्यासकट फिरत असते ह्मणतात! धर्म बुडविला या मेल्या सुधारकांनीं!"

ठमाबाई ह्मणाली "मून आहे एरवीं रुपानं देखणी, पण नाक आहे जरा चपटं."

उमाबाई ह्मणते "अन् डोळे आहेत घुबडासारखे!"

जाऊबाई ह्मणाली "त्याचं काय हो, देवानं दिलं आहे तें खरं; पण पायांत बूट कशाला हवा? हातांत हातरुमालाची काय जरूर?"

सदोबा भावोजी ह्मणाले "मी त्या वेळीं घरांत नव्हतों; नाहीं तर दाखविलें असतें कसें काय आहे तें! बाप मोठा अम्मलदार असला ह्मणून त्याची बढाई आह्मांला कशाला? निलाजऱ्या कुठल्या? मडमी बनणार मडमी?"

यमुनाबाई ह्मणाली "सासऱ्याची तरी जरा लाज? छे, ज्याचं नांव तें! त्याच्या तोंडाकडे एकसारखं टकटक पहाणं हें सासुरवासणीला शोभतं का?"

या व अशाच प्रकारच्या विषयांवर एकसारखी चर्चा आणि वादविवाद चालला होता. शेवटीं वादविवादाचें काम इतक्या कडाक्यानें चालूं लागलें, कीं, तिकडे माडीवरहि त्याचा बराच त्रास होऊं लागला; तेव्हां तिकडून जिन्याच्या दारीं येऊन पार्लमेंटाच्या अध्यक्षांनां—सदोबा भावोजींनां—रागानें हांक मारून संतापून विचारणें झालें "गाढवा! तुला किती वेळ बरें सांगितलें, कीं, बायकांमध्यें बसूं नको ह्मणून? पण अजून तूं आपलें निलाजरेपण सोडीत नाहींस. कांहींतरी काम करीत असावें, कसलेंतरी एखादें चांगलेंसें पुस्तकबिस्तक वाचीत बसावें, तें सोडून देऊन एखाद्या दळूबाई-

सारखें बायकांमध्यें रे काय सारा दिवस र—र र—र करीत असतोस? नेहमीं नेहमीं सांगायलासुद्धां लाज वाटते, पण तूं आपला दिवसेंदिवस कोडगाच बनत चालला आहेस! चल, नीघ इथून!"

तिकडून अशी संभावना होतांच अध्यक्षसाहेब हिरमुसलें तोंड करून दुसरीकडे चालते झाले. सभा बर्खास्त झाली व मंडळी घरोघर निघून गेली. तरीहि ठमाबाई आणि उमाबाई होत्याच. इतक्यांत बाहेरून मामंजी आले. त्यांनीं खुंटीवर कपडे उतरून ठेवून लोडाशीं पाठ टेंकतांच उमाबाईनीं आपलें चऱ्हाट सोडलें; त्या ह्मणाल्या "बाळासाहेब! तुह्मी तुमच्या मनोहराला बायको तर मोठी सुरेख पाहिलीत हो! पण एखादी मडमच आणतेत तर याहिपेक्षां बरं झालं असतं!"

मामंजी ह्मणाले "कां बरें? पोर जरा अल्लड आहे, एवढेंचना? बापाच्या घरीं लाडांमध्यें वागवलेली व तीहि सुधारक आई-बापांच्या घरीं, तेव्हां तुह्मां मंडळीला तिची रीतभात जरा विलक्षण वाटणार; पण मोठी होईल, आमच्या घरची रीतभात पाहील, तेव्हां हळुहळू आपोआप सगळें बेतावर येईल. पोरवय आहे—"

ठमाबाई मध्येंच ह्मणाल्या "तुह्मी आपलं ह्मणा तसं हवं तर, पण मला तिचं लक्षण कांहीं बरं दिसत नाहीं! जेवून उठलीरे उठली, कीं, उघडलं पुस्तक नाहीं तर एखादं वर्तमानपत्र आणि बसली वाचीत. बायकांनांहो हीं बुकं अन् वर्तमानपत्रं कशाला हवीं! त्यांनां परीक्षेला का जायचं आहे? का वकील बालिस्टर व्हायचं आहे? गृहस्थांच्या बायकांनां नाहीं असले हे ढंग शोभत!"

यावर मामंजी ह्मणाले "हें पहा ठमाकाकू, गृहस्थांच्या मुलींनां लिहिणेंवाचणें न शोभायला काय झालें? मला तर वाटतें,

गृहस्थांच्या मुलींनां लिहिणेंवाचणें अवश्य आलें पाहिजे. ज्यांनां लिहितांवाचतां येत नाहीं, त्या सारा दिवस शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या कुटाळ्या करण्यांत, दुसऱ्यांच्या उणीवा शोधीत बसण्यांत व नसतीं भांडणें उकरून काढण्यांत नेहमीं मग्न असतात. घरचें कामकाज उरकल्यावर राहिलेल्या फुरसतीच्या वेळीं आमच्या बायका जर शिवण्याविणण्याचें, कशिदा टोप्या काढण्याचें काम करतील, तर गरीबीच्या संसाराला कितीतरी मदत होईल व शेजाऱ्यापाजाऱ्यांमधील तंटेबखेडे मिटतील, असें नाहीं का तुह्मांला वाटत? फुरसतीच्या वेळीं साध्वी स्त्रियांचीं उत्तमोत्तम चरित्रें वाचलीं, तर त्यापासून केवढा बरें फायदा होईल? पुरुषांनीं कायतें लिहावाचायास शिकावें, बायकांनीं शिकूं नये, ही अडाणी समजूत चांगली नव्हे. शिकून फक्त वकील बॅरिस्टरच व्हावयाचें नाहीं, तर त्या शिक्षणाचा व ज्ञानाचा उपयोग संसाराचा गाडा सुयंत्रितपणें चालविण्याकडे केला पाहिजे. बायकांनीं लिहिण्यावाचण्यास शिकणें हें मोठें पाप आहे असें समजणें निव्वळ मूर्खपणा होय. घरोघर सास्वांसुनांचें, जावांजावांचें किंवा नणंदाभावजयांचें जें विळ्याभोंपळ्याएवढें सख्य असतें, त्याचें कारण दुसरें कांहीं नाहीं, तर हें बायकांमधील अज्ञान हेंच आहे. 'शंभर पुरुष एकत्र राहूं शकतील, पण दोन बायकांचें कधींहि पटावयाचें नाहीं!' असें जें ह्मणतात—आणि तें बहुतेक अंशीं खरेंहि आहे—त्याचें कारण आमच्या बायकांच्या अंगीं खिळून राहिलेल्या अज्ञानाशिवाय दुसरें कांहीं असेल तर मला सांगा? बायका जर चांगल्या सुशिक्षित असल्या, त्यांनां थोर थोर स्त्रीपुरुषांचीं चरित्रें वाचतां आलीं, बरें कोणतें, वाईट कोणतें, आपलें कर्तव्य काय आहे, आपल्यावर

केवढी मोठी जबाबदारी आहे, आपण नवऱ्याशीं वर्तन कसें ठेविलें पाहिजे, मुलांबाळांशीं, सुनांलेकींशीं कशाप्रकारें वागलें पाहिजे, इत्यादि इत्यादि सर्व गोष्टी जर त्यांनां पूर्णपणें समजल्या, तर खचित त्यांच्या हातून हल्लींप्रमाणें तंटेभांडणें व लावालावी कधींहि होणार नाहींत. आणि ह्मणून बायकांनां शिक्षण अवश्य पाहिजे. तुमच्यासारख्यांची गोष्ट राहूंद्या ? आतां तुमचें वय होऊन गेलें; पण पुढें तुमच्या सुनांलेकींनां तरी या कामीं अडथळा करूं नका. त्या लिहावाचायाला शिकल्यानें तुमच्या कुटुंबाचें यत्किंचितहि नुकसान होणार नाहीं, कांहींतरी हितच होईल. तुह्मी शांतपणें विचार कराल तर मी ह्मणतों हेंच खरें अशी तुमची खात्री होईल."

इत्यादि प्रकारें बराच वेळ मामंजींचें उपदेशपर भाषण झाल्यावर कांहीं वेळानें ठमाबाई व उमाबाई तेथून उठून गेल्या.

प्रकरण सातवें.

## तिकडची भेट आणि पत्र.

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें माझी प्रकृति सुधरत चालली होती, तरीहि घरांतल्या घरांतसुद्धां हिंडण्याफिरण्यापुरतीहि शक्ति माझ्या अंगीं आली नव्हती. अझून मी अंथरुणावरच पडून असें. मामंजी रजा संपल्यामुळें आपल्या मामलतदारीच्या जागेवर हजर होण्यासाठीं निघून गेले होते. तिकडचेंहि चारसहा दिवसांच्या आंतच मुंबईला जाण्याचें ठरलें होतें. तेव्हां बाहेरगांवीं जाण्यापूर्वीं तिकडे एकदा जेवावयास बोलवावें, असा माझ्या आईनें विचार केला. शिवाय, आह्मी फार वर्षांनीं गांवीं आलों होतों व आमची आजीहि आतांशा आमच्या येथेंच होती. तिच्याहि मनांत आपल्या नातजांवयांनां पहाण्याचें फार असल्यामुळें तिनें आईची एकसारखी पाठ पुरविली होती. माझें दुखणेंहि या वेळीं कमी झालें होतें. ह्या सर्व गोष्टी जुळून एकदा मेजवानी करण्याचें ठरलें व त्याप्रमाणें तिकडे आमंत्रणहि देण्यांत आलें.

जेवणाचा बेत सोमवारीं धरला होता. या दिवशीं सकाळपासूनच आमच्या घरीं अगदीं गडबड उडाली होती. आई, आजी आणि शेजारच्या एकदोन बाया स्वयंपाकाच्या कामांत गढून गेल्या होत्या. हळुहळू दहा साडेदहांचा अजमास झाला व तिकडली स्वारी माझ्या धाकट्या दिरासह दिवाणखान्यांत येऊन दाखल झाली. मी दिवाण-खान्याच्या शेजारच्या खोलींत कोचावर पडलें होतें. या खोलीच्या

आणि दिवाणखान्याच्या मध्यें ( व्हेनीशनची ) पट्ट्यांची एक खिडकी होती. खिडकीच्या दाराच्या पट्ट्या किंचित् वर करतांच दिवाणखान्यातील सगळा प्रकार मला दिसत असे. त्या फटींतून तिकडलें दर्शन होतांच मला फार आनंद झाला व मी शेजारच्या खोलींतच आहें हें समजावें ह्मणून "सरले ! माझ्या औषधाचा वेळ झाला, आजीला बोलाव ग !" असें तिकडे ऐकूं जाई एवढ्या स्वरानें माझ्या धाकट्या बहिणीला सांगितलें. माझा तो आवाज कानीं पडतांच तिकडली मुद्रा अधीर झाल्यासारखें दिसलें. सरलेचे हात धरून तिच्याकडून माझ्या दुखण्यासंबंधी सविस्तर हकीगत मोठ्या कळकळीनें विचारून घेतली. माझ्याविषयीं फार काळजी लागली आहेसें दिसलें. कुसुम ! त्या वेळीं माझी अवस्था कशी झाली होती ह्मणून सागूं ? डोळे भरून आले, अंतःकरण सद्गदित झालें व अंगावर कांटा उभा राहिला. तिकडचीहि स्थिति माझ्या-प्रमाणेंच झाली होती. मनांतून मला प्रत्यक्ष भेटण्याचें फार होतें, परंतु तसें घडणें केवळ अशक्य होतें. माझ्या मनाची अशी स्थिति झाली आहे इतक्यांत एक सुंदर कविता—अहाहा ! फारच रमणीय वसंततिलका—माझ्या कानीं पडली. त्या मधुर कवितेनेंच मी निम्में हुशार झालें. माझ्या अंतःकरणाच्या ठायीं आनंदचआनंद भरून गेला ! बेटा, त्या आनंदाची कल्पनाहि तुला करतां येणार नाहीं ! त्या वेळचा तो माझा आनंद किती उत्साहजनक—किती सुखदायी होता ह्मणून सांगूं ? मला त्याचें वर्णन करतां येत नाहीं. त्या आनंदाच्या भरांत मी वेडी होऊन गेलें. माझ्या आजारीपणाचें वर्तमान ऐकून तिकडच्या अंतःकरणाला तळमळ लागली होती. जिवाला बिलकूल चैन नव्हतें, त्याबद्दलची खात्री त्या सुंदर कवि-

तेनें केली. अहाहा ! तें सुंदर वसंततिलकावृत्त माझ्या कानांला किती मधुर लागलें ह्मणून सांगूं !"

कुसुमकुमारी ह्मणाली "ज्या अशा सुंदर वृत्तानं आपल्याला मोहून टाकलं होतं, तें असं होतं तरी काय ? तें कृपाकरून मला सांगाल तर फार उपकार होतील. तें ऐकण्याची मला फार उत्कंठा लागली आहे."

"बेटा ! ती रमणीय कविता मी कधींहि विसरणार नाहीं ! मीं ती अगदीं मुखोद्गत केली आहे—

**मन्मानसीं रुचिर त्वत्प्रतिमा विराजे**
**सौंदर्यपूर्ण तव ती तनु फार साजे;**
**हृद्भागिं या वसुनि येथहि राहशी गे !**
**रूपद्वया धरुनि तापद होशि कां गे ?**

कवितेसंबंधीं विषयाचा मला लहानपणापासूनच मोठा नाद असे; आणि तोच विषय माझ्या प्रिय पतीच्याहि आवडीचा आहे हें जेव्हां मला कळून आलें, तेव्हां माझा आनंद काय विचारावा ! मी दिव्य सुखाच्या मनोराज्यांत गढून जाऊन क्षणभर देहभानहि विसरलें. तिकडचें दर्शन, तिकडची विद्या हाच माझा विनोद, हेंच माझें सुख व हेंच माझें विश्रांतीचें स्थान. माझा बाह्य पोषाख वरील सुख देण्यास असमर्थ होय, असें मला वाटूं लागलें व मी आनंद-सागरांत निमग्न झालें.

अंथरुणावरून उठवत तर नव्हतेंच, पण हळुहळू कष्टानें उठलें व रांगतरांगत खिडकीपाशीं आलें. खिडकीच्या पट्ट्या जरा वर करतांच मी तिकडच्या नजरेस स्पष्ट पडलें. दिवाणखान्यांत या वेळीं

दुसरें कोणीहि नव्हतें. माझे धाकटे दीरहि खालींच आजीबरोबर बोलत बसले होते. मी खिडकीपाशीं दडून उभी असल्याचें तिकडे दृष्टीस पडतांच दार हळूच उघडलें. बेटा! त्या वेळीं आह्मां उभयतांची स्थिति कशी झाली होती ह्मणून सांगूं? तो प्रसंग मला अझूनहि आठवतो आहे. आह्मां उभयतांच्या मनांत परस्परांशीं संभाषण करण्याचें फार होतें; पण कोणाच्याच तोंडून अक्षरहि निघेना. मी तर खालीं मान घालून कांपूं लागलें; शिवाय क्षणोक्षणीं जिन्यांत कोणाचे तरी पाय वाजल्याचा भास होऊन कोणी वर येतें कीं काय असें वाटे, व काळजांत धस्स होई. तिकडली मनोहर मूर्ति डोळे भरून पहावयास मिळाल्यानें माझ्या मनाला जो आनंद झाला, तो वर्णन करणें अशक्य आहे. तिकडून खिशांतून एक पत्र काढून माझ्या हातीं देऊन ह्मणणें झालें "अरेरे! काय तुझी ही दशा? असें कोणतें दुःख तुजवर येऊन पडलें होतें? तूं इतकी शहाणी व शिकलेली असून त्या तुझ्या विद्येचा हाच ना उपयोग? वेडीरे वेडी!"

एवढें बोलत आहेत तोंच जिन्यांत खरोखरच कोणाचे पाय वाजले. तत्क्षणीं खिडकीचें दार बंद झालें. मी लगबगीनें बिछान्यावर येऊन पडलें, व तिकडच्या दिवाणखानांतल्या दिवाणखान्यांत इकडूनतिकडे फेऱ्या होऊं लागल्या. नंतर लवकरच भोजनाची तयारी झाली. सर्व मंडळी जेवावयास बसली व मी इकडे माझ्या खोलींत एकटीच पडून तिकडचें पत्र मोठ्या प्रेमानें वाचूं लागलें. पत्रांत पुढील मजकूर होताः—

"अनेक आशीर्वाद उपर,

तुझ्या अल्प समागमांत तुझी विद्या, तुझा विनय आणि तुझे सद्गुण कळून येऊन त्यापासून मला अत्यंत आनंद आणि समाधान झालें होतें. पण

इतक्यांत तुझ्या दुखण्याचें वर्तमान ऐकतांच मनाला किती दुःख वाटलें ह्मणून सांगूं ? माझें कोठेंच लक्ष्य लागेना व कोठेंहि चैन ह्मणून पडेना. तूं चांगली शिकलीसवरलेली आहेस, समजूतदार आहेस, अनेक साध्वी स्त्रियांचीं चरित्रें तूं वाचलीं आणि ऐकलीं असशीलच; परंतु जोंपर्यंत तुझ्या ठिकाणीं आर्यस्त्रीचा अभिमान जागृत होणार नाहीं, तोपर्यंत तें तुझें शहाणपण, ती तुझी विद्या आणि ते तुझे इतर सद्गुण व्यर्थ होत !

तुझ्या दुखण्याचें कारण मला कळून आलें आहे; तूं अशी वेडी आणि अपक्व विचारांची असशील, याची मला कल्पनाहि नव्हती ! यःकश्चित् पोषाखाची बाब ती कसली व त्याबद्दल जिवाला एवढें लावून घ्यावयाचें तें काय ? त्याशिवाय तुला कोणीं सुंदर ह्मटलें नसतें काय ? अहाग खुळे ! ज्या ठिकाणीं जें रुचतें त्या ठिकाणीं तें केलें पाहिजे. तुझ्या सुधारलेल्या पोषाखाचा मी तिरस्कार करतों; असें तूं समजूं नकोस, परंतु तो तुझ्या घरच्या मंडळीला—ज्या मंडळीमध्येंच आतां तुला आपल्या आयुष्याचे सारे दिवस घालविले पाहिजेत त्या मंडळीला—जर नापसंत असेल, तर त्यांच्या मर्जीखातरच कां होईना, तूं त्या पोषाखाचा त्याग केला पाहिजे. शिवाय, त्यांचें ह्मणणें तरी सर्वांशीं वावगें आहे, असेंहि माझ्यानें ह्मणवत नाहीं. प्रत्येकानें आपल्या कुलाचाराप्रमाणें वागणें यांतच त्याला भूषण आहे. तुला आमच्या घरची एकंदर रीतभात आणि व्यवस्था आवडली नसेल. परंतु वेडे ! तूं ही गोष्ट पक्की लक्ष्यांत ठेव, कीं, आज जरी तुला यापासून वाईट वाटत असलें तरी यांतच तुला पुढें सुख होईल. तूं चांगली बुद्धिमान् आहेस, तुझ्यासारखी सुशील आणि रूपवती भार्या मला सुदैवानें मिळाली ही ईश्वराची मजवर मोठी कृपा होय, असें मी समजतों. तुला विशेष लिहून तुझें कोमल अंतःकरण दुखविण्याचें धाडस मी करीत नाहीं. वर लिहिलेल्या कारणाशिवाय तुझ्या दुखण्याचें कांहीं कारण असल्यास तें मला लिहून कळीव. आतां तुझी प्रकृति कशी आहे ? जिवास आराम वाटतो कीं नाहीं ? आणि तुझी पुनः एकदा भेट होईल कीं काय ? हें सगळें पत्रोत्तरानें जरूर जरूर कळीव. कोणत्याच प्रकारची काळजी करूं नकोस आणि दुःखहि करूं नकोस. नेहमीं आनंदानें रहा व प्रकृतीला फार जपत जा.

तुझी प्रकृति लौकर सुधारून तुला आराम प्राप्त होवो, हाच तुला माझा मनापासून आशीर्वाद आहे.

मनोहर."

तिकडून आलेलें पत्र मीं प्रेमानें वाचलें. पुनः वाचलें. आणखी एकदा वाचलें. त्याला आलिंगिलें व आनंदाश्रूंनीं त्याला न्हाऊं घातलें. माझ्या मनांतील गुप्त विचार—माझ्या अंतःकरणांत रात्रंदिवस सलत असलेले विचार, तिकडे कसे बरें कळले असावे? यासंबंधीं एकसारखा विचार करीत व तिकडच्या मार्मिक आणि प्रेमळ शब्दांचें स्मरण करीत मी बिछान्यावर पडलें. क्षणांत मनामध्यें येई, कीं, अरेरे! अखेरीस माझा आवडता पोषाख नाहींसा होऊन मला एखाद्या जंगली स्त्रीप्रमाणेंच पोषाख करावा लागणार ना? माझ्या विद्वान् पतीची अशीच इच्छा असावी ना? त्यांनांहि माझ्या सुधारलेल्या पोषाखाचा तिटकारा आहे? कांहीं हरकत नाहीं! पतीला अप्रिय तें मला कितीहि जरी प्रिय असलें, तरी मी तें कधींहि करणार नाहीं. 'पण जोंपर्यंत आर्यस्त्रीचा अभिमान जागृत होणार नाहीं, तोंपर्यंत सर्व व्यर्थ आहे,' असें तिकडून कां बरें लिहिलें? मी तशी नाहीं, असें तिकडे वाटलें असेल काय? माझ्याकडून तिकडच्या आज्ञेचें कधीं तरी उल्लंघन झालें आहे काय? पण विनाकारण मला असा दोष लावणें होणार नाहीं. माझ्या हातून काय बरें दोष घडला असेल? इत्यादि विचारांत मन गढून गेलें असतां लवकरच मी निद्रावश झालें.

एक झोंप पुरी झाल्यावर मी जागी होऊन पहातें, तों माझी धाकटी बहीण माझ्या बिछान्याशेजारींच बसून खेळत आहे. मीं तिला विचारलें "सरले, आई कायग करते आहे?"

सरला ह्मणाली "आई अन् आजी मला इथें बसायला सांगून मघांच बाहेर गेल्या आहेत. तुला काय हवं ताई? मला सांग कायतें, मी आणून देत्यें."

"बाळ! मला तहान लागली आहेग. थोडं पाणी आणशील का? आणि त्या फडताळांतलं तें पुस्तक जरा इकडे घे बघूं."

माझ्या आज्ञेप्रमाणें फडताळांतील पुस्तक माझ्यापाशीं आणून देऊन सरला पाणी आणण्याकरतां खालीं गेली. ती खालीं जातांच तें मघांचें पत्र पुस्तकांत ठेवून मीं पुन्हा त्याच्या पारायणाला सुरुवात केली. त्याचीं कितीतरी पारायणें केलीं, पण मनाची तृप्ति ह्मणून होईना! इतक्यांत सरला पाणी घेऊन आली. मी चूळ भरून थोडें पाणी प्यालें. परंतु त्या पोरीचे डोळे एकसारखे माझ्या हातांतील पुस्तकाकडे लागले होते. मात्र एक बरें होतें, कीं, तिला अद्याप वाचतां येत नसे.

बालकांची बुद्धि मोठी तीव्र असते, याचा अनुभव तुला असेलच! अज्ञानामुळें त्यांनां कोणत्याहि गोष्टीचें मर्म बरोबर समजत नसतें हें खरें, तथापि त्यांची जिज्ञासा मोठी तीक्ष्ण असते. प्रत्येक गोष्टीचा छडा लावल्यावांचून तीं उगी ह्मणून बसावयाचीं नाहींत. माझ्या हातांतल्या पुस्तकाच्या बाहेर आलेलें त्या पत्राचें शेवट पाहून आणि तें वाचण्यामध्यें मी अगदीं गढून गेलें आहें हें पाहून माझ्या बहिणीच्या मनांत काय आलें कोणास ठाऊक, ती आपली मोठ्या खोल विचारांत गढून गेली. थोडा वेळ स्तब्ध राहिल्यावर ती मला विचारूं लागली "ताई! कुणाचा ग कागद वाचीत आहेस?"

सरलेचा हा प्रश्न ऐकतांच मी एकदम चपापलें. "छे! कांहीं नाहीं. आपला असाच एक कागद आहे तो." इत्यादि उडवाउडवीचीं उत्तरें देऊन मीं तिला पाण्याचें भांडें खालीं नेऊन ठेवण्यास सांगितलें व माझ्या त्या उत्तरानें त्या बापडीचें समाधान झाल्यासारखें दिसलें.

आतां चांगले पांच साडेपांच झाले होते. आई नुक्तीच बाहेरून येऊन स्वयंपाकाच्या कामास लागली होती. आजीनें बसल्याबसल्या तेलवात केली. लवकरच जेवणाची तयारी झाली. आजीनें मला ताट वाढून आणलें. थोडेंसें खाऊन मी पुनः बिछान्यावर पडलें. घरांतल्या सर्व मंडळीचीं जेवणेंखाणें आटोपल्यावर सगळींजणें आपापल्या जागीं जाऊन निजलीं. मीहि माझ्या खोलीच्या दारास आंतून घट्ट कडी लावून घेऊन निजल्याचें सोंग घेतलें. सर्वत्र सामसून होतांच हळूच उठलें. मेणबत्तीचा दिवा पेटविला, टेबलापाशीं बसलें व पेन्सिलीनेंच तिकडच्या पत्राचें पुढील उत्तर लिहिलें:—

"सेवेशीं विज्ञापना,

आपल्या दर्शनानें मी आनंदित झालें होतें. त्यांत आणखी आपल्याकडून आलेल्या प्रेमपत्रिकेनें तर मला अतिशयितच आनंद झाला. स्त्रीचा पति हाच देव आहे, हें वाक्य अगदीं सत्य आहे. आपणच माझे देव आहां, आपणच माझें जीवनसर्वस्व आहां. माझ्या हृदयाच्या ठिकाणीं आपण स्थिर वास केला आहे व ह्मणूनच माझ्या हृदयांतील विचार आपणाला समजले. आपण ताडलेली उपाधीच माझ्या विकाराचें मूळ होतें, हें या पत्रद्वारें कळविण्याला मला फार संकोच वाटतो. पण पुनःपुनः मी मोठ्या बुचकळ्यांत पडतें, कीं, हें गुप्त कारण आपल्याला समजलें तरी कसें ? माझी अशी एकहि जिवलग मैत्रीण नाहीं, कीं, जिला माझ्या हृदयांतील वेदना मीं निवेदन केल्या असतील ! ज्यापक्षीं आपण तें कारण समजून चुकलां आहां, त्यापक्षीं आतां आपल्यापासून छपवून ठेवण्यांत काय अर्थ आहे ? आणि तें छपवून तरी काय करावयाचें आहे ? आणि जो आपल्या सुखदुःखाचा वांटेकरी, इहलोकचा खरा मित्र, त्याच्याशीं छपवाछपवी कशी चालणार ? मी आपल्याशीं कधींहि कृतघ्न होणार नाहीं ! आजवर मी खचित अगदीं मूर्ख होतें. अगदीं अविचारानें मीं स्वतःला हें दुखणें लावून घेतलें. परंतु मीं आजपासून शपथ वाहिली आहे, कीं, त्या मेल्या पोषाखाचें आतां पुनरपि नांवहि काढावयाचें नाहीं ! आपणां सर्वांनां ज्यांत आनंद, तोच माझा आवडता पोषाख, तेच माझे वस्त्रालंकार व तीच मला शोभा. खरोखर मी वेडी, अज्ञानामुळें आपणां सर्वांनां फार दुःख

दिलें. मला एवढेंहि कळलें नाहीं, कीं, माझ्या आवडीपेक्षां वडिलांचेच विचार अधिक शहाणपणाचे आणि अधिक दूरदर्शी असले पाहिजेत. माझ्या मूर्खपणाच्या विचारांनीं मीं आंतल्याआंत झुरणीस लागून माझ्या स्वतःच्या प्रकृतीची खराबी करून घेतली व मजबरोबर सर्वांनां कष्टी केलें. त्या भिकारड्या पोषाखापेक्षां आपल्या समागमांत होणारा विद्यालाभ हाच माझ्या अंतःकरणास जास्त आनंद देईल, तोच माझें सौंदर्य वाढवील अशी माझी पक्की खात्री झाली आहे. आपला सहवास सत्वर घडावा अशी मला रात्रंदिवस एकसारखी उत्कंठा लागली आहे. मी बरी होतांच मला आपल्याबरोबर मुंबईला न्यावयाचें होईल ना ?

जास्त काय लिहूं ? अशक्ततेमुळें हात कांपत आहे, डोळ्यांपुढें चक्कर येत आहे, आज एवढ्यावरच आटोपतें. उत्तर पाठवावयाचें तें माझ्या नांवेंच पाठवावें. आमच्या घरीं कोणीहि दुसऱ्याचें पत्र फोडून वाचीत नाहीं.

उत्तराची चातकाप्रमाणें मार्गप्रतीक्षा करित असलेली

आपली अविचारी

पण आज्ञेप्रमाणें वागणारी

नम्र दासी,

**प्रियंवदा.**"

सदर्हु पत्र दुसरे दिवशीं सकाळीं गड्याकडून पोस्टांत टाकविलें. हा माझा पहिलाच पत्रव्यवहार असल्यामुळें माझें पत्र बरोबर पोहोंचलें कीं नाहीं, अशी शंका उत्पन्न झाली व पत्राचें उत्तर येईपर्यंत जिवाला सारखी चुटपुट लागून राहिली.

गड्यानें पत्र बरोबर पोस्टांत टाकलें होतें. तें त्याच दिवशीं संध्याकाळीं तिकडे पोंचून त्याचा जबाब दुसरे दिवशीं, अधिक तर तिसरे दिवशीं आलाच पाहिजे होता; पण तिसरा दिवस लोटला, चवथा, पांचवा हेहि दिवस गेले, तरीहि उत्तर म्हणून येईना. माझ्या जीवाला अगदीं तळमळ लागली. शेवटीं सहाव्या दिवशीं एकदाचें पोष्टाच्या शिपायानें माझ्या नांवाचें एक पाकीट आणून दिलें

व माझा जीव थाऱ्यावर आला. पत्र हातीं पडतांच तें मीं मोठ्या लगबगीनें उघडलें. मोठ्या प्रेमानें त्याचें चुंबन घेतलें व हृदयाशीं आलिंगून प्रेमभरांत वाचूं लागलें. त्यांत पुढील मजकूर होता:—

"अनेक आशीर्वाद उपर,

कांपऱ्या अक्षरांनीं लिहिलेलें तुझें पत्र पोहोंचलें. परमाल्हाद झाला. प्रेमानें तुझ्या अंतःकरणांत दृढ वास केला आहे हें पाहून मला किती आनंद होत आहे, त्याची तुला कल्पना तरी होईल का ? मध्यरात्र उलटून जाईपर्यंतहि, अशक्य स्थितींत, कांपऱ्या हातानें लांबलचक पत्र लिहिणें, हें तुझ्या मजविषयींच्या अत्युत्कट प्रेमाचें निदर्शक होय हें खरें; परंतु तूं सांप्रतच्या अशक्त स्थितींत इतके श्रम करावयाचे नव्हतेस !

तूं येथून गेल्या दिवशींच, तुझ्यामागें येथें भरलेल्या स्त्रीपार्लमेंटाच्या बैठकीनें तुझ्या दुःखाच्या कारणाची मीं अटकळ बांधली. या पार्लमेंटाची सविस्तर हकीगत समक्ष भेटीचे वेळीं मी तुला सांगेन. तुझ्या पोषाखानेंच तुला ही दशा प्राप्त झाली, यावरूनच तुला कळून आलें असेल, कीं, ज्या ठिकाणीं आपलें आयुष्य घालवावयाचें असेल त्यानें त्या ठिकाणच्या रीतिरिवाजांप्रमाणें वर्तन करणें यांतच त्याचें हित आहे, यांतच त्याला सुख आहे. प्रियंवदे ! तूं कलकत्त्यासारख्या सुधारणेच्या अगदीं शिखरास पोहोंचलेल्या शहरांत बरींच वर्षें राहिलेली आहेस; तेथच्या श्रीमान् आणि सुशिक्षित स्त्रियांमध्यें तूं मिळूनमिसळून वागलेली आहेस; त्यांचे उत्तमोत्तम आणि ऐटदार पोषाख रात्रंदिवस पाहिल्यामुळें आपणहि ऐटदार पोषाख करावा, अशी तुला इच्छा उत्पन्न होणें साहजिक आहे; पण तेथली गोष्ट निराळी व येथली निराळी ! मनुष्यानें धीर धरणें यांतच शहाणपण आहे. मी खुशाल आहें. तुझ्या अंतःकरणाची व्यथा दूर होऊन तुझी प्रकृति साफ चांगली झाल्याचें आनंददायक वर्तमान त्वरित ऐकण्याचीच इच्छा करीत आहें.

वरचेवर पत्र पाठीव. प्रकृतीस नीट जपत जा. तुझ्या इच्छेप्रमाणें योग लवकर जुळेल अशी आशा आहे. आज याहून विशेष लिहीत नाहीं. भेटीअंतीं सर्व कळेल, हे आशीर्वाद.

मनोहर".

## प्रकरण आठवें.

## बाबांचा उपदेश.

माझी प्रकृति साफ बरी झाल्यावर विजयादशमीचा सुमुहूर्त पाहून माझ्या आईनें मला माझ्या सासरीं पाठविण्याची तयारी केली. त्या दिवशीं मोठ्या पहांटेस उठून, स्नान वगैरे आटोपून, पोषाख करून, बाबांनां नमस्कार करण्यासाठीं मी त्यांच्या खोलींत गेलें. मला निरोप देतेवेळीं बाबांचा गळा अगदीं दाटून आला. कांहीं वेळपावेतों त्यांच्यानें बोलवेना. डोळेहि भरून आले. मला पोटाशीं धरून आपल्या शेजारीं कोचावर बसवून माझे पाठीवरून हात फिरवीत त्यांनीं सद्गदित स्वरानें ह्मटलें—

"प्रियंवदे ! तूं आज आह्मांला सोडून आपल्या नवऱ्याच्या घरीं राहावयास जात आहेस, याबद्दल मला अतिशय दुःख होतें. खरोखर, कन्याविरह फार असह्य आहे ! आतां तूं कुठें, आणि आह्मी कुठें ! पण जा माझे लाडके, तूं सुखानें तुझ्या घरीं जा ! जनरीतीप्रमाणें तुझ्या नवऱ्याच्या घरींच तुला सदैव सुख मिळणार असा विचार करून आह्मांला आपलें अंतःकरण कठोर करून मनाचें सांत्वन केलें पाहिजे.

"बेटा ! देवानें मला जेवढें सामर्थ्य दिलें आहे तेवढ्यांत माझ्यानें देववेल तितकें शिक्षण मी तुला देऊन चुकलों आहें. तुझ्या ऋणांतून मी बहुतेक मुक्त झालों आहें. ईश्वरकृपेनें आज तुला दोन अक्षरें समजून बरेंवाईट जाणण्याची शक्ति आली आहे. तूं शहाणी आहेस. आपलें खरें कर्तव्य काय आहे हें योग्य प्रकारें

जाणत असशीलच ! तरीहि पितृधर्माप्रमाणें आजच्या प्रसंगीं तुला दोन शब्द सांगणें हें माझें कर्तव्य असल्यामुळें मी थोडेंसें सांगतों, तें नीट ध्यानांत धर.

"तुझ्या या नव्या संसारामध्यें तुला पुष्कळच नवीन नवीन गोष्टी दिसून येतील. त्या सगळ्यांचें भाकीत करणें मानवशक्तीच्या बाहेरचें आहे. यासाठीं तुझ्या या नवीन घरीं तूं कशा रीतीनें वागलीस ह्मणजे तुला सुख होईल व तेथें तूं कशा रीतीनें वागतां कामा नये, याविषयींच्या मुख्य मुख्य दोनचारच गोष्टी मी तुला आतां सांगणार आहें. तुला सांगावयाची पहिली गोष्ट तुझ्या पोषाखासंबंधाची होय ! उंची उंची पोषाख, सोन्यामोत्यांचे दागिने आणि गोड गोड पक्वान्नें, इत्यादि क्षुल्लक बाबींमध्येंच खरें सुख भरलें आहे असा जर तुझा समज असेल, तर तूं तो अगोदर सोडून दे ! जर या गोष्टीमध्येंच खऱ्या सुखाचा थोडाबहुत तरी अंश असता, तर आपल्या आसपास जीं हजारों गरीब कुटुंबें आपण नित्य पाहतों, तीं खरोखर दुःखी असलीं पाहिजेत ! पण, तूं मोठमोठ्या ग्रंथकारांच्या पुस्तकांमधून वारंवार वाचलेंच आहेस, कीं, खरें सुख आणि खरा आनंद जर कोणाला पहावयाचा असेल तर त्याला तो 'केळीवर नारळी घर चंद्रमौळी !' अशा एखाद्या गरीबाच्या झोंपडींतच आढळून येईल ! यावरून पोषाखांत आणि दागदागिन्यांत खऱ्या सुखाचा लवलेशहि नाहीं, हें उघड आहे. बालपणामध्यें तुझे फाजील लाड करून व तूं मागितलेले नानातऱ्हेचे कपडे आणि पोषाख देऊन मीं तुला अगदीं बिघडून टाकिलें, याबद्दल खरोखर आज मला मोठा पश्चात्ताप होत आहे. पण आतां त्याबद्दल दुःख करून काय उपयोग ? व्हावयाची चूक होऊन

गेली ! माझी आतां पक्की खात्री होऊन चुकली आहे, कीं, तुम्हीं मुली ह्या आम्हां आईबापांच्या कोणीहि नसून तुमचा खरा धनी निराळा आहे ! आम्ही आईबाप फक्त नियमित काळपावेतों तुमचे रक्षक आहोंत. या रक्षकांनीं, अर्थात् आम्हीं आईबापांनीं, तुम्हांला परमेश्वरानें जेवढा काळपर्यंत आमच्या हवालीं सोंपविलें असेल, तेवढ्या मुदतीमध्यें तुमच्यावर मोठ्या प्रामाणिकपणानेंच नजर ठेविली पाहिजे. तुम्हांला भलभलत्या खर्चीकपणाच्या सवयी लावून आणि तुमचे खोटेनाटे लाड पुरवून बिघडवून सोडणें, हें खरोखर तुमच्या हक्कदार मालकांशीं आम्हीं विश्वासघातानें वागण्यासारखें आहे. परंतु ही गोष्ट फार उशिरानें माझ्या ध्यानांत आली. माझ्यासारखे दुसरे लोक तरी माझ्या या अनुभवावरून सावध होवोत, म्हणजे झालें.

"प्रियंवदे, तूं पक्कें लक्ष्यांत ठेव, कीं, मनुष्याच्या खऱ्या सौंदर्याला भाडोत्री सामुग्रीची, अर्थात् डागडागिन्यांनीं आणि उंची उंची कपड्यांनीं देह मढवून काढण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. मनुष्याचा देह सद्गुणांनीं जसा शोभतो, तसा तो दुसऱ्या कशानेंहि शोभत नाहीं ! स्वतःचें सौंदर्य वाढविणें किंवा कमी करणें हें प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या हातीं आहे. मी तुला खात्रीनें सांगतों, कीं, दोनतीन रुपयांच्या लुगड्यानें आणि साध्या खणाच्या चोळीनेंहि नवऱ्याचें संपूर्ण प्रेम, सासूसासऱ्यांचा विश्वास आणि आम्हां आईबापांचें समाधान संपादून जशा रीतीचें सुख तुला अनुभवितां येईल, तसें सुख आणि तसा संतोष, वर सांगितलेल्या आवडत्या माणसांचें प्रेम आणि भक्ति नसतां, तूं दहा हजारांची पैठणी

नेसलीस आणि पांच लाखांचे हिऱ्यामाणकांचे दागिने ल्यालीस तरी विलकूल मिळणार नाहीं, हें पक्कें समजून ठेव.

"दुसरी गोष्ट ही कीं, आईबापांच्या तोडीचे जे तुझे सासूसासरे, त्यांची मनोभावें आज्ञा पाळून ते ज्याप्रमाणें सांगतील त्याप्रमाणें तूं वर्तन कर. सासूसासऱ्यांचें मन न दुखेल अशा रीतीनें वागणें, यांतच सुनेचें कल्याण आहे. प्रियंवदे, तुला ठाऊकच आहे, कीं, माणसामाणसाच्या विचारांत आणि आवडीनावडींत पुष्कळ फरक आणि बरीच भिन्नता असते. आणि ती भिन्नता इतकी विचित्र असते, कीं, लहानपणापासून एकसारखें शिक्षण मिळालेल्या व एकाच जागीं वाढलेल्याखेळलेल्या भावंडांचीहि कधीं सगळ्या गोष्टींत एकवाक्यता होत नाहीं. मग आजकालची तुझ्यासारखी एखादी सुधारक मुलगी, आणि जुन्या आचारविचारांचे वृद्ध सासूसासरे, यांच्या विचारांत साहजिकच जमीनअस्मानाचें अंतर असलें पाहिजे. पण वयाचा अनुभव, शहाणपण आणि दूरवर विचार करण्याची संवय इत्यादि गोष्टीमुळें या वृद्ध मनुष्यांचेच विचार पुष्कळ प्रसंगीं वाजवी असतांहि, ते, जगाचा ज्यांनां अजून कांहींच अनुभव नाहीं व दूरवर विचार करण्याचा ज्यांनां मुळींच अभ्यास नाहीं, अशा अपक्व बुद्धीच्या आणि कोंवळ्या रक्ताच्या तरुण बांडांनां पटत नाहींत; व यामुळें घरांत वारंवार तंटेभांडणें आणि कज्जेकंकास होत असतात. वास्तविक ह्मटलें तर यामध्यें खरा अपराध या नव्या विचारांच्या तरुण मंडळीचाच असतो. त्याचप्रमाणें पुष्कळदा असेंहि घडत असतें, कीं, या ह्मातान्या माणसांची पाहिजे त्या रीतीनें खात्री करून दिली असतांहि व अमुक एक गोष्ट खरोखरच अहितकारक आहे हें त्यांनां पुरतेपणें कळत

असतांहि, फार दिवसांपासून त्या गोष्टीला चिकटून असल्यामुळें व रूढीचा भंग करण्याची त्यांची मुळींच इच्छा नसल्यामुळें त्यांनां तुम्हां तरुण मंडळीची नवी रीतभात आणि नवी सुधारणा बिलकुल पसंत पडत नाहीं, व त्यामुळें वारंवार म्हातारे मंडळींत आणि तरुण मंडळींत खडाजंगी उडत असते. या खडाजंगींत वास्तविक म्हटलें असतां म्हाताऱ्यांचाच अपराध असतांहि लोक तुम्हां तरुण मंडळीलाच दोष देत सुटतात. अशा या मोठ्या नाजुक स्थितींत फार दूरवर नजर पोंचवून शहाणपणानें वागण्याची तुम्हांवर दुप्पट जबाबदारी येऊन पडते. सासूसासरे समंजस असोत, अथवा हेकेखोर आणि रूढीचे कट्टे गुलाम बनलेले असोत, लष्करी कायद्यामध्यें ज्याप्रमाणें हुकूम,—मग तो कसलाहि असो,—प्रत्येकानें अवश्य मानलाच पाहिजे, त्याचप्रमाणें किंबहुना मी म्हणतों त्याहूनहि जास्त ताबेदारीनें, सासूसासऱ्यांच्या हुकुमांत राहणें यांतच प्रत्येक सुनेचें खरें सुख, खरी शोभा आणि खरें कर्तव्य आहे ! अशीच ताबेदारी आईबापांशींहि असणें चांगलें खरें, तथापि आईबापांच्या आज्ञावंदनांत जी कांहीं चूक किंवा हयगय होते ती त्यांच्या प्रेमामुळें सहज झांकून जाते. आईबाप आपल्या लेंकरांचे जे लाड करीत असतात आणि त्यांचें मुलांवर जें प्रेम असतें, त्या प्रेमाच्या अंगीं असा प्रभावच आहे, कीं, लेंकरांचे लहानसहान दोष सहज लपून जातात. पण सासूसासऱ्यांची गोष्ट तशी नाहीं. सुनेचे कितीहि अल्प दोष असोत, त्यांच्या डोळ्यांस ते तत्क्षणीं दिसतात. यासाठीं, सासूसासऱ्यांच्या मर्जीविरुद्ध एक पाऊलसुद्धां तूं कधींहि टाकूं नकोस. शिवाय, राजीखुशीच्या आज्ञावंदनांत जें सुख आणि जें प्रेम आहे, तें बळजबरीच्या सलामींत मुळींच नसतें ! सासू-

सासऱ्यांनां आईबापांप्रमाणें लेखून जर तूं त्यांची प्रत्येक आज्ञा मनापासून पाळलीस, तर त्यांत तुला एक प्रकारचा आनंद होईल, त्यांत तुला एका तऱ्हेची मौज वाटेल, तुझ्या अंतःकरणास संतोष उत्पन्न होईल, आणि आपल्याशीं तूं नम्रतेनें वागतेस हें त्यांनां कळून आल्यानें त्यांचें तुझ्यावर विशेष प्रेम बसेल आणि अंतीं तूं सुख पावशील. पण याच्या उलट जर सासूसासऱ्यांच्या सांगण्याविरुद्ध तूं वागूं लागशील, तर पोरी, तूं पक्कें लक्ष्यांत ठेव, कीं, पावलोपावलीं तुला शिव्यागाळी, वर्मी भाषणें, टोमणे आणि अपेश सोसून घ्यावें लागेल व नवऱ्याचें तुझ्यावर कितीहि प्रेम असलें आणि तो तुझा प्रत्येक शब्द जरी झेलीत असला तरी तुला खरें गृहसुख स्वप्नांतसुद्धां मिळणार नाहीं !

"तिसरी गोष्ट, घरांतील नणंदाजावांशीं मिळूनमिसळून गुण्यागोविंदानें राहणें, ही होय. नणंदाजावांशीं एकोप्यानें वागतां येण्यासाठीं जी गोष्ट सदैव लक्ष्यांत वागविली पाहिजे ती ही, कीं, ज्या आपल्या या नव्या मैत्रीणींबरोबर यापुढें आपल्याला सारें आयुष्य घालविलें पाहिजे, त्यांचे हवे ते विचार आणि हवे ते दोष आपल्याला ठाऊक असोत, त्यांची वागणूक आपल्याला नापसंत असो, त्याविषयींचें आपलें बरेंवाईट मत आपण आपल्यापाशींच ठेविलें पाहिजे. दुसऱ्याचे दोष असतील ते त्याला मोकळ्या मनानें दाखविणें कधीं कधीं हितकर होतें खरें, तथापि कुटुंबाच्या शांतीचा भंग न व्हावा ह्मणून प्रत्येक समंजस स्त्रीनें दुसऱ्यांच्या खऱ्याखुऱ्या व्यंगांवरहि होईल तितकें झांकणच घालीत असावें. लोकांची घाण उपसण्याचें पातक माथीं घेऊं नये.

"यावर कदाचित् तूं ह्मणशील, कीं, 'तर मग एखाद्याच्या अंगीं असलेल्या दोषांविषयीं खरें असेल तेंहि बोलूं नये कीं काय ?' होय, नयेच बोलूं! तुझ्या या प्रश्नावर मी पुनः तुला असें विचारतों, कीं, कोणा एखाद्याचें अगदीं खरेंखुरें व्यंग उघडकीस आणल्यापासून आपल्याला काय बरें फायदा होणार आहे? तूं जर तसें केलेंस तर लाभ मात्र एवढाच होईल, कीं, तुह्मां उभयतांमध्यें भयंकर कलह सुरू होईल, तुह्मी रात्रंदिवस परस्परांवर दांतओंठ चावाल आणि तूं जरी खरे दोष उघडकीस आणलेस तरीहि सूड घेण्यासाठीं तुझ्यावर नसत्याच दोषांचा आरोप होईल व त्यामुळें मग स्वसंरक्षणार्थ तुला त्यांचे खोटेहि दोष उभे करावे लागतील; आणि शेवटीं तुमच्यांतील या कलहानें साऱ्या कुटुंबाच्या स्वस्थतेची आणि सुखाची राखरांगोळी होईल. ह्मणून बाळ, मी तुला पुनःपुनः सांगतों, कीं, मूळापासूनच तूं सर्वांशीं गुण्यागोविंदानें वाग. कसाहि प्रसंग आला तरी तूं कोणाचेंहि मन वर्मी भाषणानें किंवा टोमण्यानें कधींहि दुखवूं नकोस व कोणाशींहि तंटाभांडण करूं नकोस.

"अविचारी बायकांमध्यें दुसऱ्यांची निंदा करण्याला सुरुवात कशी होत असते, त्याचें तुला एक उदाहरण सांगतों. समज, तुझ्या घरीं एक नणंद आणि एक जाऊ आहे व त्यांमध्यें तुला वागावयाचें आहे. कदाचित् तुझ्या या नणंदाजावांचें घोडें एका जागीं पाणी पीत नाहीं व तुला यासंबंधीं कांहींएक माहिती नाहीं. आतां, या दोघींमध्यें जी बायको विशेष कावेबाज आणि आंतल्या गांठीची असेल ती पहिल्याप्रथमच तुला आपलीशी करून घेण्याच्या उद्योगाला लागेल. बाहेरील खोट्या भुलवणुकींनीं मोह घालून ती तुला अगदीं आपलीशी करून घेईल. तुझ्यावर विशेष प्रेम दाखवील,

आपण तुझी विशेष काळजी बाळगतों असें तुला भासवील. तुला कांहीं चोळी, खण किंवा दुसरें कांहींतरी देईल आणि या सर्व गोष्टींनीं तुझ्यावर ती आपला इतका जबरदस्त पगडा बसवील, कीं, तिनें ऊठ ह्मणतांच तूं उठशील व बस ह्मणतांच बसशील. तुह्मां उभयतांची एवढी दाट मैत्री जमली ह्मणजे ती आपल्या विरुद्ध-पक्षीय मनुष्याच्या प्रत्येक हालचालीवर आणि बोलण्याचालण्यावर गुप्तपणें पहारा करण्याला तुला शिकवील. आणि यदाकदाचित् तुझ्या या जिवलग मैत्रिणीच्या विरुद्ध पक्षाचें माणूस नादानपणानें तुझ्यासमक्ष तिच्याविरुद्ध कांहीं बोललेंच तर तूं ऐकलेल्या गोष्टींत आपल्या पदरचें बरेंचसें तिखटमीट ढकलून आपल्या मैत्रिणीची विशेष आवडती बनण्यासाठीं तिच्यापाशीं तूं चहाडी करशील. पण पोरी, मग काय परिणाम होईल हें तुला माहीत आहे ? तुझ्या या चहाडीमुळें त्या दोघांमध्यें नवा तंटा लागेल व तीं एकमेकांचीं कट्टीं दुस्मान बनतील. आणि खरें ह्मटलें, तर त्याचें सारें पाप तुझ्याच माथ्यावर बसेल. यास्तव बाळ, तूं कोणाशींहि अशा प्रकारची मैत्री कधींहि ठेवूं नकोस. तर सर्वांशीं अगदीं सारख्या रीतीनें वागत जा. अमकें काय ह्मणतें ? तमकें काय बोलतें ! वगैरेसंबंधीं तुला कोणीं खोदखोदून विचारलें तरी तूं नेहमीं दोन्ही कानांवर हात ठेवून साफ सांगत जा, कीं, आपल्याला कांहींएक माहीत नाहीं ! वास्तविक तुला माहीत असूनहि जरी तें माहीत नाहीं असें सांगितलेंस, तरी मी सांगतों, त्यांत मुळींदेखील पाप नाहीं ! तुझ्यासमक्ष जर कोणाची निंदा होऊं लागली तर तूं तेथून एकदम उठून दुसरीकडे जा.

"चौथी गोष्ट, पतीशीं कसें वागावें याविषयींची; परंतु आजकालच्या तुह्मी पोरी, आपल्या नवऱ्याला वश करण्याच्या कामीं व त्याला आपल्या मुठींत ठेवण्याच्या कामीं इतक्या पटाईत आहां, कीं, त्यासंबंधीं तुला माझ्या उपदेशाची मोठीशी आवश्यकता असेलसें मला वाटत नाहीं.

"पत्नीच्या कर्तव्याविषयीं वात्स्यायन ऋषींनीं केलेला उपदेश या वेळीं तुला सांगणें हें माझें कर्तव्य आहे. वात्स्यायन ह्मणतात:—

'जी पतिव्रता पत्नी आहे तिनें आपल्या पतीचा पूर्ण विश्वास संपादन करावा, आणि त्याला देव समजून त्याची मनोभावें एकनिष्ठपणें सेवा करावी. पति परवानगी देईल तर एकंदर गृहकृत्यांचा भार तिनें आपल्या शिरावर घ्यावा. घर चांगलें झाडूनसारवून नीटनेटकें ठेवावें, नानाप्रकारच्या सुवासिक पुष्पांनीं सुशोभित करावें, आणि जमीन चकचकीत ठेवावी. सासूसासरे, जावानणंदा, दीरभावे आणि त्याचप्रमाणें घरांतील इतर माणसांशीं तिनें आदरानें वागून त्यांच्या सुखाविषयीं झटावें. ज्योतिष सांगणाऱ्या, जादुटोणा करणाऱ्या आणि गोसावणीबैरागिणीसारख्या स्त्रियांशीं तिनें भाषणहि करूं नये. पति बाहेरून येत असतां त्याचा स्वर कानीं पडतांच त्याची आज्ञा काय आहे हें समजून घेण्यासाठीं तिनें तत्पर रहावें. दासीला बाजूला करून आपण स्वतः त्याचे पाय धुवावे. अगदीं एकटें असतांना देखील वस्त्राभरणांनीं विभूषित झाल्याशिवाय पतीच्या दृष्टीस पडूं नये. पति वाजवीपेक्षां फाजिल खर्च करीत असेल, किंवा योग्य रीतीनें खर्च करीत नसेल, तर तो एकटा असेल त्या वेळीं ती गोष्ट त्याला प्रेमळपणानें समजावून सांगावी. लग्नसमारंभ, वनभोजन किंवा पुष्कळ मंडळी जमते

अशा समारंभांत पतीच्या संमतीशिवाय तिनें कधींहि जाऊं नये. पतीला प्रिय वाटणाऱ्या करमणुकींत तिनें आपला वेळ घालवावा. पति निजल्यावर निजावें व तो उठण्यापूर्वीं तिनें उठावें. स्वयंपाक स्वतः करावा. पतीच्या हातून कांहीं अपराध घडल्यास तिनें थोडासा राग आणावा व त्याची कानउघडणी अवश्य करावी; परंतु हें मर्यादेबाहेर मात्र जाऊं देऊं नये. जादुटोणा करून पतीचें मन प्रसन्न करून घेण्याचा तिनें कधींहि प्रयत्न करूं नये. रागाचे शब्द, संतप्त मुद्रा, तोंड चुकवून बोलणें, दरवाजांत उभें राहून बाहेर पहाणें, बागेंत परक्याशीं बोलत रहाणें, एकांतस्थलीं बराच वेळ रहाणें, इत्यादि गोष्टी तिनें कधींहि करूं नयेत. पत्नीनें सदोदित शुचिर्भूत आणि व्यवस्थेनें रहावें. प्रसंगाला साजेलसा साधा किंवा उंची पोषाख करावा. पति कांहीं व्रत किंवा उपोषण करीत असल्यास तिनेंहि तसेंच करावें. आपली संपत्ति आणि पतीचा उपदेश तिनें कोणालाहि कळवूं नये. स्वयंपाककला, गृहकृत्यें, पतिसेवा यांत निष्णात असल्याचा लौकिक संपादण्यांत तिनें कोणालाहि हार जाऊं नये. आदा पाहून खर्च करावा. भोजनानंतर दूध शिल्लक राहिल्यास विरजण लावून त्याचें दहीं, ताक, लोणी व तूप करावें. तेल आणि साखर यांची नीट व्यवस्था लावावीं. फुरसतीप्रमाणें कापसाचें सूत काढून वस्त्रें विणावीं. तांदूळ सडून नीटनेटके करावे. कण्या, कोंडा यांचा कांहींना कांहीं उपयोग करावा. चाकरमाणसांच्या पगाराचा हिशेब ठेवावा. शेताच्या लागवडीकडे आणि गुराढोरांच्या पोषणाकडे लक्ष्य द्यावें. गोठ्यावर आणि तबेल्यावर देखरेख करावी. कोंबडे, लावे, पोपट, कोकीळ, मोर, वांदरें आणि हरणें व गुरेंढोरें इत्यादि पाळलेल्या प्राण्यांच्या दाण्यापाण्याची तरतूद दररोज करावी,

व प्रतिदिवशीं आपल्या जमाखर्चाचा हिशेब स्वतः जमवावा. आपल्या पतीचीं व घरांतील जुनीं वस्त्रप्रावरणें तिनें जमवून ठेवावीं व प्रसंगाप्रमाणें तीं लायक नोकराचाकरांस किंवा भिकाऱ्यांस द्यावीं. पतीच्या जिवलग मित्रांनां फुलांचे हार, उटी आणि सुपारी देऊन त्यांचा आदरसत्कार करावा. सासूसासऱ्यांची सेवाशुश्रूषा करावी. त्यांची आज्ञा सदैव मानावी. कधींहि त्यांनां प्रत्युत्तर करूं नये. त्यांच्याशीं मर्यादेनें आणि मित भाषण करावें. त्यांच्यासमक्ष अव्यवस्थित रीतीनें किंवा उच्चासनावर बसूं नये. त्यांच्यासमक्ष मोठ्यानें हंसूं नये. पतीचे मित्र तेच तिचेहि मित्र असावे व पतीच्या शत्रूंनां तिनें आपलेहि शत्रू लेखावें.'

"दोनहजार वर्षांपूर्वीं वात्स्यायन ऋषींनीं आर्य पत्नीला केलेला हा उपदेश प्रत्येक स्त्रीनें मनन करण्यासारखा आहे. आतां पत्नीच्या कर्तव्याविषयीं एका अर्वाचीन इंग्लिश स्त्रीचें ह्मणणें काय आहे, तें मी तुला सांगतों. लेडी बर्टन ह्मणतेः—

'अगदीं पहिली गोष्ट ह्मणजे पत्नीनें पतीचा जोडीदार होण्यास, मित्र होण्यास शिकावें आणि पतीला सल्लामसलत देण्यास आपण योग्य व विश्वासू आहों असें त्याच्या प्रत्ययाला आणून देऊन त्याला घरीं कसलीहि उणीव भासूं देऊं नये. पुष्कळ पुरुषांनां वाटत असतें, कीं, कित्येक गोष्टी बाहेर मिळतात त्या घरीं मिळणें शक्य नाहीं. हा त्यांचा समज दूर करण्यास झटावें. घरांत सर्व कांहीं मिळणें शक्य आहे, असें त्याच्या प्रत्ययास आणून दिलें ह्मणजे अर्थातच तो घराबाहेर अशा गोष्टी मिळविण्याच्या नादास लागणार नाहीं. पति आजारी पडला असतां त्याची काळजीपूर्वक शुश्रूषा करावी, घर त्याला सुखावह होईल असें करावें. घर कितीहि

लहान आणि गरिबीचें असलें तरी तें घर आहे, हें स्त्रीनें विसरूं नये. दारिद्र्यानें ग्रासलेल्या घरांत बसण्याची पुरुषांनां लाज वाटते आणि ह्मणून ते अशा घरीं बसण्यापेक्षां क्लबामध्यें जाण्यास उत्सुक असतात. यासाठीं गरीबीच्या घरांतहि त्याचें मन रमेल असें करण्याविषयीं झटावें. पतीच्या शारीरिक सौख्याकडे विशेष लक्ष्य पुरवावें. प्रत्येक बाबतींत पत्नीनें आपली स्वतःची सुधारणा करावी आणि प्रत्येक गोष्टीची माहिती करून घ्यावी, ह्मणजे तिची स्वतः-चीहि उन्नति होईल आणि पतीच्या उद्योगांत तिला साह्य करतां येईल. पतीबरोबर बाहेर पडण्यास पत्नीनें सदैव तयार असावें आणि पुरुषांप्रमाणें धैर्यानें प्राप्त स्थितीला तोंड द्यावें. पतीवर असलेलें आपलें प्रेम त्याच्यापासून लपवून ठेवूं नये; आपल्या प्रत्येक कृत्यांत त्याच्या तें स्पष्टपणें दृष्टोत्पत्तीस येऊं द्यावें. कोणत्याहि गोष्टींत त्याच्याविरुद्ध जाऊं नये. त्याच्यासमक्ष मर्यादेनें आणि नम्रपणें वागावें. त्याचप्रमाणें कधींहि विनय आणि शालीनता यांचा त्याग करूं नये. तथापि तिनें वाजवीपेक्षां फाजील लज्जाशील बनूं नये. आपल्या स्वतःच्या शरीराविषयीं आणि कपड्यालत्त्यांविषयीं कधींहि निष्काळजी राहूं नये. पत्नीचें बाह्य सौंदर्य आणि पोषाख पाहून पतीच्या नेत्रांनां आनंद होईल अशा रीतीनें तिनें वागावें. पतीच्या हिताविषयीं तिनें सदा दक्ष रहावें. तो कोठें बाहेर जाईल त्या वेळीं आपल्यामागें घरांतील एकंदर गोष्टींकडे पहाण्यास आपल्यासारखेंच काळजीचें मनुष्य ठेवून आपण जात आहों, असें त्याला वाटूं द्यावें, ह्मणजे कधींकाळीं कामानिमित्त त्याला कोठें दूर जाण्याचा प्रसंग आला तर तो मागची काळजी करणार नाहीं. त्याला आवडणाऱ्या प्रत्येक गोष्टींत पत्नीनें लक्ष्य घालावें. पतीची खरी मैत्रीण होण्याला

त्याला काय आवडतें याची पत्नीनें प्रथम माहिती करून घेतली पाहिजे. त्याला बागेंत गाजरें लावणेंहि का आवडेना, पत्नीनेंहि त्या गाजरांची माहिती करून घेतली पाहिजे. आपलीं गृहछिद्रें आपल्या मैत्रिणींनां कधींहि सांगूं नये. पतीचे दोष कोणाच्याहि दृष्टोत्पत्तीस येऊं देऊं नये. प्रत्येक संकटांत आणि प्रत्येक अडचणींत त्याचा पाठीराख्या व्हावें. पतीचा अपमान होण्यासारखें भाषण पत्नीनें आपल्या समक्ष कोणालाहि बोलूं देऊं नये आणि जर इतकेंहि करून कोणी नच ऐकेल तर तिनें तेथून उठून जावें. कठोर भाषण किंवा मर्मभेदक थट्टा करून केव्हांहि पतीचें मन दुखवूं नये. पति जेव्हां पत्नीचे दोष दाखवील तेव्हां तिनें त्यावर प्रत्युत्तर देऊं नये. त्याच्या हातून चूक झाली आहे असें समजलें असतां, विशेषतः तो स्वतः तें तिला सांगत असतां त्याला दोष देऊं नये, किंवा रागाच्या भरांत त्या गोष्टीचा उल्लेख करून त्याला कधींहि हिणवूं नये. एखाद्या गोष्टींत तो फसला, तर तशा वेळीं त्याला धीर देत जावा; त्याचा कधींहि उत्साहभंग करूं नये. उभयतांमध्यें कांहीं वितुष्ट आल्यास तें खोलींतल्या खोलींत ठेवावें. खोलीबाहेर कोणालाहि त्याचा यत्किंचितहि सुगावा लागूं देऊं नये. पत्नीनें स्वतः धार्मिक वृत्तीनें राहून दुसऱ्याला चांगलें उदाहरण घालून द्यावें. पतीच्या कल्याणाविषयीं परमेश्वराची तिनें सदैव प्रार्थना करीत असावें. आपला चरित्रक्रम असा पवित्र आणि शुद्ध ठेवावा, कीं, त्यामुळें आपल्या पतीचेंहि पारमार्थिक कल्याण होईल, ईश्वराकडे त्याचें लक्ष्य लागेल, अनाथअपंगांविषयीं त्याच्या मनांत दया उत्पन्न होईल आणि दुसऱ्याशीं त्याचें वर्तन सौम्य आणि उदारपणाचें होईल, अशा रीतीनें स्वतः वागून त्याचेंहि मन वळवावें. पतीच्या

शारीरिक आणि मानसिक स्वास्थ्याची तिनें सदोदित काळजी घ्यावी. पतीचीं पत्रें तिनें कधींहि उघडूं नये. तो आपण होऊन जें तिला सांगणार नाहीं, तें त्याच्याजवळून काढून घेण्याचा यत्न तिनें कधींहि करूं नये. पति आणि त्याची इतर आप्तमंडळी यांच्यामध्यें पत्नीनें कधींहि येऊं नये. तीं त्याच्याजवळ रहातील असें करावें. त्यांच्यासाठीं तो जें जें कांहीं करावयास पाहील त्या त्या कामीं पत्नीनें त्याला मनोभावानें मदत करावी. आणि त्या सर्व मंडळीचें तिच्यावरहि प्रेम जडेल व त्यांना ती परकी अशी मुळींच वाटणार नाहीं, अशा रीतीनें त्यांच्याशीं वागत जावें. प्रत्येक गोष्ट चालवून घ्यावी; केव्हांहि आणि कोणत्याहि गोष्टीमुळें अडून राहील असें करूं नये.'

"प्रियंवदे ! मीं तुला या ज्या चारदोन गोष्टी सांगितल्या, या तूं नेहमीं लक्षांत वागीव. कधींहि वाईट मार्गानें जाऊं नकोस आणि कोणाकडूनहि वाईट ह्मणून घेऊं नकोस. आतां फार उशीर झाला. जा, तूं तुझ्या घरीं जा, देव तुझें कल्याण करील. हा माझा उपदेश तुझ्या नेहमीं स्मरणांत रहावा यासाठीं 'मुलीची पाठवणी' ह्मणून रचिलेल्या कविता मी तुला देतों, ह्या तूं लक्ष्यपूर्वक वाच आणि त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय कर." असें सांगून व माझ्या हातांत एक कागद देऊन बाबांनीं मला निरोप दिला.

प्रकरण नववें.

## मुलीची पाठवणी.

कुसुमकुमारी ह्मणाली "आपल्या वडिलांनीं कवितारूपानं आपल्यालां केलेला उपदेश ऐकण्याची माझी फार इच्छा आहे. त्या कविता आपल्यापाशीं आहेत का ?"

संन्यासिनी ह्मणाली "आतां त्या कविता कांहीं माझ्यापाशीं नाहींत. तथापि मीं त्या मुखोद्गत केल्या आहेत. ऐकण्याची तुझी मर्जीच असली तर तुला मी केव्हांतरी त्या ह्मणून दाखवीन."

कुसुमकुमारी यावर नम्रपणें ह्मणाली "माई, आपल्या वडिलांचा एकंदर उपदेश ऐकून मला इतका कांहीं आनंद झाला आहे, कीं, कवितारूपानं त्यांनीं आपल्याला आणखी काय उपदेश केला होता, तें आतांच ऐकायास मिळेल तर माझ्यावर आपले अनंत उपकार होतील."

"बरें बेटा. तुझी एवढी उत्सुकताच आहे तर मी त्या ह्मणतें. ऐकः—

"ऐकें मुली कुलीने ! वर्णीं स्वसतीस धन्य तो धर्म,
धन्य द्रुपदसुता ती, यत्कृति सकलांस देतसे शर्म.
'धर्म ह्मणे शकुने ! जी रूपें श्रीला, क्षमागुणें महिला
साजे, सखी अखिन्ना कृत्यभरें सुमति आमुची महिला.
शरदुत्पलपत्राक्षी शरदुत्पलपुण्यगंध समगंधा,
अस्खलित चालवी गृहधर्मीं मज यष्टि पथिं जशी अंधा.
आधीं जिणें उठावें, पाहुनि निजलों असें मग निजावें,
रागेजणें सुदुर्मिळ तेंहि जिचें ज्वाळसें गगनिं जावें.
धौम्यापासुनि गोपांपर्यंत जिणें स्वयें समाचार

प्रकरण नववें.

## मुलीची पाठवणी.

कुसुमकुमारी ह्मणाली "आपल्या वडिलांनीं कवितारूपानं आपल्याला केलेला उपदेश ऐकण्याची माझी फार इच्छा आहे. त्या कविता आपल्यापाशीं आहेत का ?"

संन्यासिनी ह्मणाली "आतां त्या कविता कांहीं माझ्यापाशीं नाहींत. तथापि मीं त्या मुखोद्गत केल्या आहेत. ऐकण्याची तुझी मर्जीच असली तर तुला मी केव्हांतरी त्या ह्मणून दाखवीन."

कुसुमकुमारी यावर नम्रपणें ह्मणाली "माई, आपल्या वडिलांचा एकंदर उपदेश ऐकून मला इतका कांहीं आनंद झाला आहे, कीं, कवितारूपानं त्यांनीं आपल्याला आणखी काय उपदेश केला होता, तें आतांच ऐकायास मिळेल तर माझ्यावर आपले अनंत उपकार होतील."

"बरें बेटा. तुझी एवढी उत्सुकताच आहे तर मी त्या ह्मणतें. ऐकः—

"ऐकें मुली कुलीने ! वर्णी स्वसतीस धन्य तो धर्म,
धन्य द्रुपदसुता ती, यत्कृति सकलांस देतसे शर्म.
'धर्म ह्मणे शकुने ! जी रूपें श्रीला, क्षमागुणें महिला
साजे, सखी अखिन्ना कृत्यभरें सुमति आमुची महिला.
शरदुत्पलपत्राक्षी शरदुत्पलपुण्यगंध समगंधा,
अस्खलित चालवी गृहधर्मी मज यष्टि पथिं जशी अंधा.
आधीं जिणें उठावें, पाहुनि निजलों असें मग निजावें,
रागेजणें सुदुर्मिळ तेंहि जिचें ज्वाळसें गगनिं जावें.
धौम्यापासुनि गोपांपर्यंत जिणें स्वयें समाचार

ध्यावा, श्रिततापहर श्रीगंगेचा तिचा समाचार.'
हे शब्दमणी वागविं हृदयीं प्रेमें तसे न रत्नमणी,
गुणगण चिंतामणिसम व्हावें त्याचें बये ! सदैव धणी.
प्रातःकाळीं उठुनी शुचि व्हावें, शांत चित्त ठेवावें,
भावें कर जोडावे, ईशातें भक्तिपूर्व सेवावें.
स्मरुनी ईश मनीं—जो थोर जगद्धार नित्य सांवरितो,
लागावें मुदित मनें करण्याला गे ! घरांत वावर तो.
संतृप्त मुदित चित्तें गृहकर्मीं जे विशंक रावेल,
ते स्त्री सकलां होई मान्य, प्रिय जेंवि शंकरा वेल.
करुनि सडासंमार्जन, जपुनी घालीं सुरेख रांगोळी,
निर्मळ गृह बघुनि मुखीं घालू जन कौतुकेंचि आंगोळी.
वेणीफणी करावी नीट, नसावें चटोरपण तींत,
सहज सुरूपीं तुळितां कृत्रिमता शून्य होय गणतींत.
कृत्रिम पुष्पें दिसती सुंदर, परि देति काय परिमळ तीं?
अंतर्गुण तो नसतां, बाळे गे ! रम्य काय परि मळती !
परकी न त्यांस मानीं असती जे स्वजन दीर, जावा गे !
मत्सर करीं न, न विटो त्यांनां मन, तव न धीर जावा गे !
कोणास न निंदावें, कोणाचें शत्रु कधिं न वा होणें,
सुज्ञें परकीयांच्या कलागती लावणें न गे ! कोणें.
सद्वर्तनास ठेवीं, होउं नको तूं प्रवृत्त वादास,
विनयेंच मान मिळतो, गोडेंपण देइ साधु–वादास.
कुजनासह सज्जन तव सच्छील करील जाण हें सोनें,
परिसाशीं झगडे जें आयस होतें स्वयेंचि तें सोनें.
जन्मापासुनि तुजला प्राणासम समजलों न गे ! ऊन,
तुजसह सुखनिधि अजि परि अन्य करीं अर्पितोंच नेऊन.
जे परकी ते झाले बाळे ! तव आजपासुनी आप्त,
पर, कीं परकीयत्वचि आम्हांला आज जाहलें प्राप्त !
होतों सुखांत बाळे ! सुखांत पाहोनि सर्वकाळ जिला,
कशि नांदशील ती तूं पतिगृहिं, अशि वाहुं सर्व, काळजीला.

होइल उदास सारें, आह्मां भासेल शून्य हें सदन,
कोमेल हृत्कुमुद मम होवोनि तुझें अदृश्य शशिवदन.
ये कंठ भरोनि, फुटे शब्द न, नयनांत लोटतें वारी,
मत्तुल्य स्थिति तवही होय, परी दुःखलोट ते वारीं.
जाईं बाळे ! डोळे पूस, मना आवरीं, नकोचि रडों,
आह्मां वृद्धांचीं गे दुःखें हृदयें बये ! नको चिरडों.
जी जी विवाहिता स्त्री तिस पतिसदनीं अवश्य गे ! जाणें,
सोडीं मोहा, जोडीं निश्चय, जनरीति ही असे, जाणें.
जें गृहशिक्षण आह्मीं दिधलें त्याची बरी करीं चीज,
कर्तव्यीं, सत्कर्मीं, परोपकारीं बये सदा झीज.
सन्मार्गें चालावें, दिशा धरीं नित्य साधु-रीतीची,
सेवावें तिस जों जों, तों तों वाढे सुमाधुरी तीची.
पतिसेवा आद्य स्त्रीकर्तव्य स्मर असें मनामाजी,
संतुष्ट ठेवुनी त्या होइं सुखी हीच कामना माझी.
पति दैवत आद्य असे, तोचि असे स्त्रीस आत्म-जन्म-हित,
तव चित्तचकोर तया चंद्राला भजुनि होउ सन्महित.
क्रोध सदा आवर तूं, मग तव गातील लोक गुणगीतें,
कलहास कोप चेतवि, वायु जसा क्षिप्र अल्प फुणगीतें.
पति कोपती तरी तूं त्यजीं न विनया, न शांतिला ढळवीं,
होतांच शांत तन्मन, सस्मित मधुरोदितें तया वळवीं.
सुविनीत, सुशीलवती, सुखमूर्ति अशा सतीस पति वर्णी,
स्वपतिकृत स्तुति सुख दे तीस सुधावृष्टिशी सदा कर्णीं.
वाचीं पतिव्रतांचीं पुण्यचरित्रें बये ! मनोभावें,
तत्कृति-गुण-कीर्तीतें चित्त तुझें सर्वथैव लोभावें.
कंटक पदांत शिरला जोरानें काढिल्यास कळ लागे,
जरि शमविशील सुवचें दुष्ट, तरी मदुपदेश कळला गे !
शांति क्षांति प्रकटीं, त्याच सुवृत्तींत मोहनी जादू,
विषतरु वितरू कडु फळ, अमृत तरु परी फळे फळें स्वादू.

तरवार वार न करी, हृदयांत जसें करील कटुक वच,
वचक तुझा राहिल गे, वरिशील मनीं जरी क्षमा–कवच.
गोसावी, संन्यासी, भोंदू येती स्त्रियांस ठकवाया,
तद्वहिरंगा भुलुनी भ्रमूं भ्रमूं तूं नको कधीं वाया.
विश्वास दाखवोनी फसविति भोळ्यांस पिहितमुख खळगे !
तैसें स्त्रियांस, वरुनी करुनी अति दंभ अमृतमुख खळ गे !
परम शिव जींत नांदे, जी दुःखें सर्व आठरा खणती,
तुज मंगल जनकाशी काशीसम होय पाठराखण ती.
जा बाळे ! पतिसदनीं, देतों तुज सर्व मंगला-शीला,
जाई सन्मार्गानें, मलिन करुं नको स्वमंगला शीला.

प्रकरण दहावें.

## आईचा निरोप.

बाबांकडून निरोप घेतल्यावर आईच्या पायां पडावयास गेलें. त्यावेळीं आईला आलेला गहिंवर आंतल्यांआंत दाबण्याचा तिनें जरी बराच प्रयत्न केला, तरी तो बाहेर फुटल्यावांचून राहिला नाहीं. एकसारखी अश्रु ढाळीत मला कडकडून मिठी मारून माझी प्रेमळ आई ह्मणाली " मुली! तूं आज आह्मांला सोडून जातेसना? आज पंधरासोळा वर्षं तूं सतत माझ्याजवळ राहिलेली. क्षणभर तूं डोळ्याआड होतांच मला कसंसंच होई. परंतु आतां तर तूं मला अक्षय अंतरणार, हें मनांत येऊन, जिवाचं कितीहि जरी सांत्वन केलं, तरी दुःख कांहीं आवरत नाहीं! बाळ, तुला आतां तुझ्या नवऱ्याच्या घरींच सदोदित राहिलं पाहिजे. त्या ठिकाणीं तूं कशा रीतीनं वर्तन केलं पाहिजे हें तूं जीं नेहमीं सती स्त्रियांचीं चरित्रं वाचीत असतेस त्यांवरून तुला समजून आलंच आहे. शिवाय, तिकडूनहि या बाबतींत तुला बराच उपदेश झालेला आहे. आणखी मी जास्त तें काय सांगणार? तरीहि मायेमुळं माझ्यानं या प्रसंगीं तुला दोन शब्द सांगितल्यावांचून राहवत नाहीं. बायकोमाणसानं दरेक कामांत तत्पर असावं. ज्या ठिकाणीं जें रुचेल तेंच त्या ठिकाणीं करावं. दुष्ट माणसांनां नेहमीं भिऊन वागावं. त्यांच्या वाऱ्याला कधीं उभं राहूं नये. जें आपल्याला बरोबर कळलं नसेल तें न लाजतां दुसऱ्यापासून समजून घ्यावं. कोणतीहि गोष्ट नीट समजून घेतल्याशिवाय उगीच घाई करून बिघडवून टाकूं नये. आपल्यावर सर्वांचं प्रेम

बसेल असं वागावं. वैभवाचे वेळीं उन्मत्त होऊं नये, आणि विपत्तीचे वेळीं भिऊन जाऊं नये. वडील माणसांशीं नम्रतेनं वागून त्यांची प्रत्येक आज्ञा आनंदानं मान्य करावी. आपल्या कामीं दक्ष असावं. लहानमोठ्यांचं मन हरण करावं. नोकरांचाकरांशीं ममतेनं वागावं. आणि सर्वांकडून 'भलं' ह्मणवून घ्यावं, हेंच कुलवंतांनां भूषण होय."

नंतर निरोप देतांना आईनेंहि मला कवितारूपानें उपदेश केला. तोहि मोठा गोड असल्यामुळें त्या कविता मी तुला ह्मणून दाखवितें.

सकाळीं मुली ! काढुनी केरवारे,
गृहा सारवोनी करीं स्वच्छ सारें;
फुलें स्वस्तिकें रांगुळीचीं लिहावीं,
अशीं कीं, जनें कौतुकें तीं पहावीं !
निगा चांगली राख वृंदावनाची,
जया पाहतां तृप्ति व्हावी मनाची;
फुटोनी तरू येत जेव्हां बहार,
फुलें वेंचुनी गुंफ तूं लांब हार.
वेणी बरी घालुनियां सकाळीं,
अत्यादरें कुंकुम लाव भाळीं;
मोठें नसावें, टिकली नसावी,
लोकांमध्यें सज्जनता दिसावी.
किती घालिती कंचुकी फार तंग,
तसे तूं नको दाखवूं रंगढंग;
धरावी तुवां रीत नेमस्त साधी,
बरें वागुनी कीर्तितें नित्य साधीं.
नको फार हव्यास गे ! भूषणांचा,
धरीं लोभ चित्तीं सदा सद्गुणांचा;
पती-शुश्रुषा बोलणें नम्रवाचे,
अलंकार हे जाण तूं बायकांचे.

पक्वान्नें, शाकभाज्या, रुचिकर चटण्या, रायतीं, भात नाना,
कार्यप्रस्थीं करोनी बहुत चतुरता दाखवावी जनांना;
टोप्या, कुंच्या शिवाव्या परकर अवघीं सारुनी सर्व कामें,
द्यावा सद्बोध बालां, कधींच बसुं नये बायकांनीं रिकामें.
सांगाव्या भूपतींच्या अति सुरस कथा शूरशा राउतांच्या,
खोट्या गोष्टी न सांगे भयजनक अशा राक्षसांच्या भुतांच्या;
नीतींचें सार घेई निवडुनि बरवें दुग्ध जैसा मराळ,
येरंडाचें—नको गे निजमुख शिणवूं,—गाळुनीयां गुऱ्हाळ.

सतीला पतीवांचुनी देव नाहीं,
असो नित्य चित्तीं तुझ्या भावना ही;
मणाची बिडी बोलती हा विवाह,
परी जाण तो अमृताचा प्रवाह.

सेवावें वडिलांस भक्ति धरुनी, आज्ञा धरावी शिरीं,
जावा दीर बघूनियां पडुं नको तूं मत्सराच्या भरीं;
ठेवीं चाकरनोकरांवरि दया मातेपरी सर्वदा,
पाहोनी धनवैभवा फुगुं नको गर्वाभिमानें कदा.
नीतीबोधक पुस्तकें निवडुनी वाचीत जावीं बरीं;
शृंगारात्मक नाटकें जनकथा घेऊं नको तूं करीं;
चाली मंजुळ लावुनी कधिं कधिं गाणीं ह्मणावीं मुखें,
केव्हां नूतन चित्तवेधक अशीं आंगें रचावीं सुखें.

आदाय पाहुनि मुली ! करिं खर्चवेंच,
नाहींतरी पुढति येइल फार पेंच;
बारीक दृष्टि बहुधा पुरुषांत नाहीं,
ती बायकांस धरणें बहु इष्ट पाहीं.
सारे घरांतिल गडी असती अनाडी,
माजीमधेंहि करिती बहुधा लबाडी;
आकारणें वजन माप कधीं तपाशीं,
घालूं नको जिकिर फार परंतु त्यांशीं.

त्यांनीं धनीण ' बहु दक्ष ' असें ह्मणावें,
घेवोनि धाक हृदयीं वळतीस यावें;
ठेवीं हिशोब जपुनी पुरवीं पदार्थ,
होवो तुझें गृहिणी नाम मुली यथार्थ.
बाजारभाव चढतो पडतोहि केव्हां,
तोटा नफा बघुनि सांठिव धान्य तेव्हां;
होईं उदार धन खर्चुनि योग्य काळीं,
आहे ह्मणूनि सहसा न करीं दिवाळी.
थेंबें थेंबें भरुनि जलही सांठतो कीं तलाव,
जोडोनीयां लघुलघु फळ्या होतसे भव्य नाव,
पैसा पैसा जमवुनि तसा रंक होतो कुबेर,
संसारीं हें समजुनि करीं योग्य तो फारफेर.

यथाशक्ति हातें करीं दानधर्म,
नसे थोर त्यासारखें पुण्यकर्म;
अनाथास देतां घडे पुण्य फार,
धरीं अंतरीं त्यांतलें एक सार.
कुलाचार ते चालवीं भक्तिभावें,
नसे चांगलें ठेवणें त्यांस नांवें;
स्त्रियांचीं व्रतें पाळ गे ! तूं सदैव,
जिथें भक्ति तेथें वसे नित्य देव.

शांती सोडुं नको, कधीं रुसुं नको, स्वच्छंद वागूं नको,
लज्जा सांडुं नको, उगी बसुं नको, कोणास मागूं नको;
रागें बोलुं नको, अढी धरुं नको, चोरून खाऊं नको,
कोठें जाउं नको, परस्थ पुरुषां पाहून हांसूं नको.
स्त्रियांनां ह्या लोकीं, समज पति हा देव पहिला,
तयायोगें पावे सकल सुखसौभाग्य महिला;
तयाच्या आज्ञेला निशिदिनिं मुली तत्पर रहा,
धरीं प्रेमा चित्तीं तनमन सुखें त्यासचि वहा.

प्रियंवदा.

नसे पातिव्रत्यासम युवतिंना धर्म जगतीं,
पतीच्या सेवेनें इहपर मिळे उत्तम गती;
जरी एक्या चित्तें पतियुवति संसार करिती,
तरी स्वर्गापेक्षां सुखनिधिस येईल भरती.
कोणी कोणी गुरु करुनियां गुप्तसा मंत्र मागे,
कोणी बोवा ह्मणुनी नमुनि नित्य पाठीस लागे;
चित्तीं आणीं सकल परि तो व्याप आहे ठगांचा,
नाहीं बाई ! अनुभव तुला पूर्ण आला जगाचा.

अशांच्या नको लागु तूं व्यर्थ नादा,
अपेक्षीं सदा त्वत्पतीच्या प्रसादा;
तया सेवुनी घालुनी गोड अन्न,
बरें वागुनीयां करीं सुप्रसन्न.
ज्या ज्या स्त्रिया पतिवरी धरितात भक्ति,
लाभे तयांस जगतांतचि मोक्षमुक्ति;
ह्याहूनियां अधिक तें तुज सांगु काई,
घेईं जनाकडुन तूंहि भली भलाई.

आला चुकून पतिच्या जरि कोप चित्तीं,
मानूं नको विषम, तूं धरिं शांतवृत्ती;
वेळीं तयाकडुनियां अपमान झाला,
सोशीं; नको उलट उत्तर देऊं त्याला.

ओढाळ फार मन हें करि सत्यनाश,
लावूनि बद्ध करिं त्यास विवेकपाश;
जें जें मिळेल तुज त्यांतचि तृप्त राहें,
जें सौख्य तें सकल ह्यांतचि सत्य आहे.

## प्रकरण अकरावें.

# आर्याधर्म.

आईचा, बाबांचा व त्याचप्रमाणें एकंदर वडील माणसांचा निरोप आणि आशीर्वाद घेऊन मी सासरीं आलें. या प्रसंगीं मीं माझा पूर्वींचा सुधारकी पोषाख टाकून देऊन वडील माणसांच्या इच्छेप्रमाणें साधाच पोषाख केला होता. कमानदार जाकिटाला पेटीमध्यें कायमची जागा देऊन साधीच चोळी घातली होती. रेशमी कांठाचें लाल लुगडें नेसलें होतें व इतर सर्व पोषाख आमच्या घरच्या रीतीरिवाजाप्रमाणेंच केला होता. आणि तुला खरोखरीच सांगतें पहिल्या-पहिल्यानें जरी कसेंसेंच वाटत असे, तरी पुढेंपुढें मला हाच पोषाख विशेष चांगला वाटूं लागला. साधेपणांत जी कांहीं शोभा आणि आनंद आहे, ती शोभा आणि तो आनंद नटण्याथटण्यांत मुळींच नाहीं, अशी माझ्या मनाची पक्की खात्री झाली. आपल्या रीतीरिवाजांच्या विरुद्ध वागल्यानें आपले लोक नाकें मुरडतात ते मुरडतात, पण परकेहि दूषण देतात; ह्मणून प्रत्येकानें आपलेपणाचा अभिमान कायम ठेवून वागणें फार चांगलें, असें मला आतां पक्कें कळून आलें व त्याप्रमाणें मी वागूंहि लागलें. असो.

माझ्या स्थितींत घडलेला हा विलक्षण फरक पाहून सासरच्या एकंदर मंडळीला फार समाधान वाटलें. माझी आजेसासू, सासू, मामंजी वगैरे मंडळी, आपली आज्ञा मीं शिरसा मान्य केली ह्मणून मला वारंवार शाबासकी देऊं लागली, व सर्वजणें माझेवर पूर्वींपेक्षां अतिशय प्रेम करूं लागलीं.

अशा प्रकारच्या आनंदांत दिवस हां हां ह्मणतां निघून गेला. रात्रीं सर्वांचीं जेवणेंखाणें आटोपलीं व सर्व मंडळी आपापल्या जागीं जाऊन निजली. मीहि माझ्या खोलींत गेलें. या ठिकाणीं स्वारी मोठ्या उत्कंठेनें माझी वाट पाहतच बसली होती. फार दिवसांनीं परस्परांनां परस्परांचें दर्शन झाल्याबरोबर जो कांहीं आनंद झाला, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. मी खोलींत पाय ठेवितें न ठेवितें तोंच तिकडून चटकन् उठून माझा हात धरून मोठ्या कळकळीनें माझ्या प्रकृतीसंबंधीं व माझ्या माहेरच्या मंडळीसंबंधीं हकीगत विचारून घेतली. सुखदुःखाच्या अनेक गोष्टी बोलण्यांत बरीच रात्र उलटून गेल्यावर आह्मी निद्रावश झालों. मोठ्या पहाटेस कोंबडा आरवतांच मी उठलें आणि प्रातर्विधि वगैरे उरकून गृहकृत्यांत पडलें.

मीं सुधारकी पोषाख वर्ज्य केल्यामुळें घरच्या व शेजारच्या मंडळीची मजवर विशेष प्रीति बसली. शेजारीपाजारी बायकाहि माझी फार वाहवा करूं लागल्या. तिकडे तर फारच आनंद झाल्याचें दिसलें. वारंवार एकांतामध्यें "वाः ! आतां कशी सुंदर दिसतेस ! नाहींतर तो पूर्वीचा तुझा छिचोर आणि घाणेरडा पोषाख !" असें ह्मणून मला बळेंच चिडवावें; पण त्यापासून मला आनंदच होई. तात्पर्य, साधा पोषाख करूं लागल्यापासून मला कोणत्याहि रीतीचें दुःख न वाटतां उलट फार आनंद आणि सुखच होऊं लागलें. घरची आणि बाहेरची सर्व मंडळी मजवर अतिशयच प्रेम करूं लागली, त्यामुळें तर मला कृतकृत्य वाटूं लागलें.

थोडे दिवस लोटल्यावर तिकडून कपाटामधून एक छोटें पण सुंदर पुस्तक काढून माझ्या हातीं दिलें व मला ह्मटलें " हें नीट

मननपूर्वक वाच, ह्मणजे तुला आर्यस्त्रीचें कर्तव्य काय आहे आणि अनार्या कोणाला ह्मणतात, हें कळून येईल. ”

तिकडच्या आज्ञेप्रमाणें मीं तें पुस्तक मन लावून वाचलें. आणि खरेंच सांगतें, माझ्या जिवाला त्यापासून बरेंच समाधानहि झालें.”

“ माई ! ” कुसुमकुमारी सद्गदित स्वरानें ह्मणाली “ आपल्या अद्भुत वृत्तांतापासून खरोखर मला पुष्कळ बोध होत आहे. आपली माझी ओळख झाली हें मी माझें महद्भाग्य समजत्यें. आपल्या विद्वान् पतीनें आपल्याला वाचायाला दिलेलं पुस्तक आपणहि एक वेळ वाचावं, अशी मला फार उत्कंठा लागली आहे. मला तें थोडा वेळ देण्याची कृपा कराल काय ? ”

“ बेटा ! माझ्याजवळ सध्या तें पुस्तक नाहीं. तथापि त्यांतील मजकूर माझ्या पक्का स्मरणांत आहे, तो मी तुला सांगतें, ऐक.

‘ आर्यावर्त अथवा भरतखंड, यांत जन्मलेली स्त्री ती आर्या. जी स्त्री शांतस्वभावी, क्षमाशील, धर्मनिष्ठ, स्वार्थाचा त्याग करणारी, कष्ट सहन करणारी आणि पति हेंच आपलें परम दैवत समजणारी, तीच आर्या पतिव्रता होय ! ती पतिसेवेनिमित्त असह्य यातनांना-देखील जुमानीत नाहीं. पतीच्या इच्छेप्रमाणें वर्तणें हाच ती आपला परमधर्म समजते.

आर्यस्त्रीच्या घरीं मूर्तिमंत पवित्रता वसत असते. ती एखाद्या निर्जन वनांतील भिकार पर्णकुटीमध्येंहि पतिसन्निध राहून कंदमुळें भक्षण करणें हाच स्वर्ग समजते; परंतु रम्य नगरींतील सुंदर उपवनामधल्या एखाद्या भव्य आणि सुशोभित राजमहालांतहि पतिविरहित राहणें केवळ नरक आहे, असें मानिते.

आपलें जीवित ऐहिक सुखाप्रीत्यर्थच आहे असें मानून तदनुसार वर्तन करणारी स्त्री अनार्या होय. या स्त्रीचें जीवित पशुसमान मानावें. जगताच्या कल्याणास्तव जिचें जीवन आहे, तिच्याच जीविताचें साफल्य समजावें. ती कधींहि ऐहिक सुखाची इच्छा करणार नाहीं व तदर्थ झटणार नाहीं; तर नेहमीं अखंडसुखाची अर्थात् स्वर्ग-लोकीं प्राप्त होणाऱ्या सुखाचीच इच्छा करील व तत्प्रीत्यर्थच झटेल.

आर्यस्त्रीच्या मुखामधून नेहमीं नम्र, मधुर आणि प्रेमयुक्त भाषण निघतें. तिच्या सुखमय सहवासानें पतीला परम सुख होतें. तिच्या भाषणानें पतीला अमृतवृष्टीचा भास होतो. अंतःकरणांत प्रेमाचे पाझर फुटतात. तिचें तेजःपुंज प्रसन्न मुख पाहून त्याचें मन सुप्रसन्न होतें, डोळे तृप्त होतात. तिचा स्पर्श चंदनरसाच्या अभिषेकाचा अनुभव देतो, व ती पतीची प्रीतिपात्र होऊन बसते.

सत्कुलोत्पन्न, सुस्वरूप, व्यवहारचतुर, प्रेमळ, सुशिक्षित आणि पतीच्या इच्छेप्रमाणें वर्तन करणारी स्त्री आर्या होय.

ज्या स्त्रीचा वियोग पतीला पीडा देतो व त्याचप्रमाणें पतिवियोगामुळें जी स्त्री शोकाकुल होते, तीच स्त्री आर्या होय.

पतीशिवाय इतर पुरुषांमध्यें वृद्ध असतील त्यांनां बंधुसमान, आणि लहान असतील त्यांनां पुत्रासमान जी मानिते आणि जिच्या हृदया-मधून सतत निर्मल प्रेमाचा झरा वाहत असतो, तीच आर्या होय.

पतीचा कोप जिला वज्रासारखा, तिरस्कार अग्नीसारखा, आणि पतीचें प्रसन्नमुख हेंच सुखाचें धाम असें जी समजते, ती स्त्रीच आर्या होय !

आर्येच्या ठिकाणीं छिछोरपणा, अमर्यादा आणि अविवेक कधींहि आढळावयाचा नाहीं.

आर्येच्या भालप्रदेशावरील कुंकुमतिलक मंगल सुचवितो, करकंकण सौभाग्य सुचवितें, तिनें परिधान केलेलें रक्त वस्त्र तिला देवीरूप भासवितें. तात्पर्य, आर्येचा एकंदर वेष तिला पतिव्रतेची प्रतिमा बनवितो.

अशा पवित्र आर्येच्या पोटीं जन्म घेणारीं बालकें भरतभूमीला शोभा देतील व त्रिभुवनांत आपलें यश सदैव गाजवितील. सांप्रत या आर्यभूमी-भरतखंडा-ला दुर्दिन प्राप्त होण्याचें कारण अशा पवित्र आर्यांची अवनति हेंच आहे ! भारतवर्षांतील सती सीता, दमयंती, कुंती, सुभद्रा वगैरे पवित्र आर्या सांप्रत कोठें आहेत ? सीता ही सार्वभौम राजाची कन्या आणि महाप्रतापी राजा रामचंद्राची पट्टराणी होती. बालपणापासून अतुल वैभव, ऐश्वर्य, सुख यांचा यथेच्छ उपभोग ती घेत होती. तिच्या ऐश्वर्यास आणि दासदासींस कांहीं पारावार नव्हता ! तरी पतिसहवासासाठीं अपार सुख, वैभव आणि ऐश्वर्यादिकांवर लाथ मारून तिनें महान् कष्ट सहन केले ! केवळ लोकापवादासाठीं प्रभु रामचंद्रांनीं लक्ष्मणाकरवीं एकाएकीं तिला एका भयंकर निर्जन अरण्यांत नेऊन टाकविलें. त्या बापडीचा यत्किंचित् अपराध नव्हता. नऊ मास भरलेले; मनुष्याचें नांवहि जेथें ऐकूं येणें अशक्य अशा भयंकर आणि अज्ञात स्थळीं तिला ठेवण्यांत आलें; व्याघ्रसिंहादि क्रूर वन्यपशूंच्या आरोळ्यांनीं भेसूर भासणाऱ्या वनांत ती आपल्या आयुष्याचा एकेक क्षण कंठित होती; परंतु धन्य त्या साध्वीची ! तिनें पतीच्या आज्ञेचें उल्लंघन तर काय, पण त्याला एक अयोग्य शब्द तरी उच्चारला असेल तर ! आपला प्रियपति सुखी असो, त्याचें कल्याण होवो, जन्मोजन्मीं आपल्याला हाच पति लाभो, अशी परमेश्वरापाशीं

नित्य प्रार्थना करीत तिनें बारा वर्षें दुर्धर वनवासांत घालविलीं आणि शेवटीं पतिसहवर्तमान स्वर्गसुख पावली ! आर्या सीता इचें नांव भरतखंडांत घरोघर गात असतात.

मरेपर्यंत पतीचें आपल्यावर अखंड प्रेम रहावें, हीच आर्येची परम इच्छा असते. ती सासू, सासरा, जावा, नणंदा, दीर व इतर आप्तस्वकीय मंडळीशीं आदरानें वर्तन करते.

आर्या नेहमीं पतीच्या पूर्वीं शयनावरून उठून प्रातर्विधि उरकते व घरांत सडासंमार्जन करिते. स्वयंपाकाचीं सर्व भांडीं घांसू-नपुसून लख्ख केल्यावर चूल वगैरे नीट सारवूनलिंपून अग्नि पेटविते व स्नान करून शुचिर्भूत होऊन स्वादिष्ट अन्न शिजविण्याच्या तयारीस लागते. तदनंतर पाटपानें मांडून प्रसन्न मनानें पति, सासूसासरे, दीर, इत्यादि वडील मंडळीस भोजन वाढून उरलेलें आपण भक्षण करते. रात्रींहि याचप्रमाणें करून, गृहकृत्यें आटोपल्यावर पतिसेवेला हजर होते. पति निद्रावश झाल्यावर त्याच्या ठायींच लीन होऊन त्याच शय्येवर निष्काम आणि जितेंद्रिय होऊन शयन करते.

आर्या मोठ्यानें कधींहि बोलत नाहीं. त्याचप्रमाणें अति भाषण करीत नाहीं. मुखावाटे अयोग्य शब्द उच्चारित नाहीं. पतीकडून जास्त खर्च करवीत नाहीं; आणि धर्म, अर्थ संपादन करण्यामध्यें पतीला आडकाठी करीत नाहीं.

निष्काळजीपणा, अविचार, क्रोध, हेवा, चहाडी, द्वेष, मत्सर, अभिमान, विषयासक्ति, आत्मस्तुति, ईश्वराचे ठिकाणीं अनास्था, चोरी, ढोंग इत्यादि दुर्गुण आर्येच्या ठायीं बिलकुल वसत नाहींत.

पतिशिवाय आपल्याला गति नाहीं हें आर्येच्या मनांत पूर्णपणें बिंबलें असल्यामुळें पति निर्धन झाला तरी दुःख न मानतां त्याच्या सान्निध्यांतच ती सुख मानते. आपल्या मधुर आणि प्रेमळ भाषणानें दुःखामध्यें ती नेहमीं पतीचें मन रिझवीत असते. ती कधीं स्वतंत्र राहण्याची इच्छा करीत नाहीं. कारण, बाळपणीं पिता आणि वृद्ध-पणीं पुत्र, यांच्या आश्रयानें नसणाऱ्या स्त्रिया शुद्ध असल्या तरी लोकनिंदेला पात्र होतात, अशी तिची ठाम समजूत असते.

पति परदेशीं गेला असेल त्या वेळीं अंगावर उत्तम वस्त्रेंभूषणें घालून शृंगार करणें, लग्नसमारंभादि प्रसंगांत मिरवणें, हंसणें-खिदळणें, दुसऱ्याचे घरीं जाणें, किंवा कसलेहि मौजेचे खेळ खेळणें, इत्यादि गोष्टी आर्या कधींहि करीत नाहीं. पतीच्या विरहामध्यें पतीचे ठायीं संपूर्ण लक्ष्य गुंतवून ती देवाच्या पूजेअर्चेंत मग्न असते.

घरामध्यें नोकरचाकर खपत असले तरी आर्या आपल्या देहाला कष्ट देऊन घरचें बहुतेक कामकाज स्वतःच करिते. पतीच्या सेवे-संबंधाचें तर प्रत्येक काम स्वतःच करून त्याला प्रसन्न ठेविते. पतीला कधीं कष्टी होऊं देत नाहीं. स्त्रियांच्या सर्व सुखाचा आधार पति आहे. पति सुखी असला तरच स्त्रीला सुख आणि पति दुःखी तर अखेरपर्यंत स्त्रीच्या दैवीं दुःखच आहे, ही तिची अखंड भावना असते.

पिता, बंधु आणि पुत्र इत्यादिकांपासून स्त्रीला नियमित सुखाचीच प्राप्ति होते; परंतु भर्त्यापासून लाधणाऱ्या सुखाची महती विशेष असून तेंच खरें सुख होय, असें आर्या मनामध्यें समजते.

सर्व संबंधांमध्यें पतीचा संबंध अत्यंत निकट आहे, यामुळेंच पत्नीच्या सुखदुःखाची कळकळ जेवढी पतीला वाटते तेवढी

दुसऱ्या कोणालाहि वाटत नाहीं; आणि पति जितका पत्नीच्या हितासाठीं झटत असतो तितका दुसरा कोणी झटत नाहीं. म्हणूनच पतीची मनापासून सेवा करावी, हाच स्त्रियांचा परमधर्म होय, असें आर्या मानिते.

जी स्त्री पतीशीं नेहमीं नम्र आणि मधुर भाषण करिते, आपल्या सद्वर्तनानें आणि सद्गुणांनीं त्याला आनंद देते, जिचा स्वभाव आणि शील उत्तम असून आचरण अत्यंत शुद्ध असतें, जिचें चित्त प्रसन्न असून पतीच्या ठायींच रममाण झालें असतें, तीच धर्मचारिणी समजावी.

पति क्रोधाविष्ट झालेला असो, तो कितीहि कठोर शब्द बोलो, तरीहि त्याच्याशीं जी सदा आर्जवानेंच वर्तन करिते, तीच खरी पतिव्रता होय.

जी स्त्री प्रसन्नमनानें भर्त्याची नित्य सेवा करिते, आणि मर्यादेनें वागून विनययुक्त भाषण करिते, तीच धर्मनिष्ठ समजावी.

स्त्रीला पति हाच देव, पति हाच स्नेही आणि पति हाच सर्व कांहीं आहे. पतिविना स्त्रीला अन्य दैवत नाहीं आणि गतिहि नाहीं.

जी गुणवती स्त्री, नित्य सासूसासऱ्यांची चरणसेवा करिते आणि मातापितरांच्या भक्तीमध्यें तत्पर राहते, ती महान् तपस्विनी समजावी.

पतिव्रता स्त्रीनें पतीला कधींहि क्रूर दृष्टीनें पाहूं नये, त्याला कधींहि दुष्ट वचन बोलूं नये आणि मनामध्येंहि त्याचें अप्रिय कधींहि चिंतूं नये.

स्त्रीनें पतीला कार्यामध्यें मंत्र्याप्रमाणें सल्लामसलतगार व्हावें, काम करण्यामध्यें दासीप्रमाणें व्हावें, भोजनप्रसंगीं मातेप्रमाणें व्हावें; शय्याप्रसंगीं रंभेप्रमाणें व्हावें, धर्मकर्मामध्यें अनुकूल व्हावें आणि क्षमा करण्यामध्यें पृथ्वीप्रमाणें व्हावें. पतिव्रता स्त्रीचे हे सहा गुण आहेत.

पति येतांच त्याला उठून सन्मान द्यावा, त्याच्याशीं नम्रतेनें भाषण करावें, नेहमीं त्याच्या चरणांकडे दृष्टि ठेवावी, त्याची सेवा स्वतः करावी, तो निजल्यावर मग आपण निजावें व पहांटेस त्याच्या अगोदर उठावें, हाच आर्येचा सनातन धर्म आहे.

पुरुष जोंपावेतों अविवाहित असेल तोंपावेतों तो अधम समजावा. कारण, तो एकटा राहिल्यानें प्रजा उत्पन्न होत नाहीं. यास्तव त्याला स्त्रीची आवश्यकता आहेच. विवाह होतांच तो पूर्ण होतो. घर हें घर नव्हे, तर स्त्री हेंच घर होय. स्त्रीविना घर अरण्य होय. अरण्यामधील एखाद्या वृक्षाखालीं पुरुष स्त्रीसहवर्तमान राहत असेल तर त्या स्थलाला घर ह्मणतां येईल; परंतु स्त्रीचें वास्तव्य नसलेला मोठा महालहि अरण्यवत् समजावा !

ज्या कुलामधील स्त्रिया दुःखी असतात त्या कुलाचा तत्काल क्षय होतो. परंतु ज्या कुलांतील स्त्रिया संतुष्ट असतात त्या कुलाची सदा वृद्धि होते. यास्तव प्रत्येकानें स्त्रियांचा नेहमीं सत्कार करावा, वस्त्राभूषणादिकांनीं त्यांना संतुष्ट ठेवावें व त्यांच्याशीं आदरानें वागावें.

प्रकरण बारावें.

## आर्या आणि अनार्या.

तिकडून वाचावयासाठीं दिलेल्या पुस्तकांत आर्या आणि अनार्या स्त्रीची एक मजेदार गोष्ट लिहिली होती, ती आतां मी तुला सांगतें:—

बडोदें शहरांत कांहीं वर्षांपूर्वीं विष्णुपंत आणि गोविंदराव या नांवाचे दोन दक्षिणी गृहस्थ राहत असत. या उभयतांचें घर कोंकणांत एकाच गांवीं असून परस्परांची बाळपणापासून दाट मैत्री होती. दोघेहि बडोदें येथें एकाच आफिसांत नोकरीस असल्यामुळें तर त्यांचा स्नेह विशेष वाढला होता. परक्या मुलखांत, आपल्या गांवचा किंवा आपल्या ज्ञातीचा कोणी दिसतांच, जणों तो आपल्या घरच्या मंडळीपैकींच कोणी आहे, असें ज्याला त्याला वाटणें साहजिकच आहे. याहि एका कारणामुळें उभयतांमध्यें फारच घरोबा झाला होता. आफिसांतून सुटतांच, दोघांनींहि नेहमीं बरोबर कोठेंतरी फिरावयास जावें, किंवा विष्णुपंतांच्या घरीं बरीच रात्रपर्यंत गप्पा मारीत बसावें. गोविंदरावांचें बिऱ्हाड सिद्धनाथ येथें असून विष्णुपंत रावपुऱ्याच्या सडकेवर राहत असत. आफिसांत जाण्यायेण्याचा रस्ता विष्णुपंतांच्या घरावरूनच असल्यामुळें, उभयतांची जातांयेतांना नेहमीं भेट होई. विष्णुपंतांच्या कुटुंबाचें नांव आनंदीबाई असून गोविंदरावांच्या पत्नीचें नांव यशोदाबाई असें होतें. आनंदीबाई खरोखर आनंदाचीच मूर्ति होती, पण यशोदाबाईचा स्वभाव विचित्र असे ! आनंदीबाई आपल्या प्रिय भर्त्याचें मन प्रसन्न राखण्यासाठीं रात्रंदिवस एक-

सारखी झटत असे, तर इकडे आमची कर्कशा यशोदाबाई नवऱ्याला आपल्या मुठींत ठेवण्यासाठीं सारा दिवस धडपडत असे. आनंदीबाईनें आपल्या पतीचा सन्मान ठेवावा, तर यशोदाबाईनें नवऱ्याचा पदोपदीं उपमर्द करावा. तात्पर्य, त्या दोघींच्या स्वभावांत, विस्तव आणि पाणी यांचें अंतर होतें. विष्णुपंत स्वर्गसुखाचें यथेच्छ सेवन करीत, परंतु गोविंदराव बापडे रात्रंदिवस दुःखवास भोगीत !

विष्णुपंतांची प्रिय पत्नी आनंदीबाई केवळ साध्वी होती ! तिच्या अंतःकरणांत पतीविषयीं निर्मल प्रेमाचा झरा एकसारखा वाहत असून तिचें वर्तन गंगेसारखें पवित्र होतें ! ती साक्षात् पवित्रतेची मूर्तीच होती ! विष्णुपंतांस नेहमीं दहा वाजतां आफिसांत जावें लागे, यामुळें आनंदीबाई दररोज मोठ्या पहांटेस उठे, प्रातर्विधि उरकून बाहेर दिसतें न दिसतें तोंच सडापोतेरें करी व नित्याच्या स्वयंपाकास लागणारीं भांडींकुंडीं स्वच्छ घांसूनपुसून लख्ख झाल्यावर पाणी भरी व चहासाठीं चुलीवर भांडें ठेवून पलंगावर गुलाबी झोंपेंत गुंग असलेल्या विष्णुपंतांस "बाहेर उशीर बराच झाला; उठायचं आतां," असें मंजुळ वाणीनें ह्मणून जागें करी. विष्णुपंत शौचविधि आटोपून येईपर्यंत आनंदीबाईनें इकडे मोरीजवळ पाट मांडावा, पाण्यानें भरलेली स्वच्छ कळशी आणि तांब्या ठेवावा, जवळच दांत घांसण्याकरितां राखुंडी ठेवावी व त्यांच्या मुखमार्जनाची एकंदर तयारी करावी. तिकडून येऊन तोंड वगैरे धुऊन ते उभे राहतात तोंच, तोंड व हात पुसावयाला हातांत टुवाल घेऊन ती उभी असावयाची. माडीवर जाण्याचाच काय तो अवकाश, तिकडे चहाची तयारी असे. इतका सगळा विधि होईपर्यंत सहा साडेसहा व्हावयाचे. मग विष्णुपंत दिवाणखान्यांत वर्तमानपत्रें वगैरे वाचीत

बसत व इकडे आनंदीबाई स्नान आटोपून स्वयंपाकाच्या तयारीस लागे. घड्याळांत नवांचा ठोका पडण्यापूर्वींच तिनें वरण भात, दोन भाज्या, एखाददुसरी चटणीकोशिंबीर, पोळ्या वगैरे स्वयंपाक सिद्ध करावा. नंतर स्वच्छ धुतलेला पंचा आणि टुवाल न्हाणीमधील खुंटीवर ठेवून ऊन पाण्यानें घंगाळ भरून विष्णुपंतांस आंघोळीकरितां हांक मारावी. त्यांची आंघोळ होतांच, दांडीवर वाळत असलेलें धूतवस्त्र निऱ्या करून त्यांच्या हातीं द्यावें व आपण माजघरामध्यें संध्येचें मांडायाला जावें. त्यांची संध्या आटोपतांच लगबगीनें ऊन ऊन आणि मिष्ट पदार्थ त्यांच्या पानावर वाढावे व जवळ बसून प्रसन्नमुद्रेनें त्यांनां काय हवें नको तें विचारून व आग्रह करकरून त्यांची भोजनतृप्ति करावी. भोजन झाल्यावर आनंदीबाईनें अंगावरील सोवळें वस्त्र सोडून ठेवून शुभ्र पातळ नेसावें व पानाचें तबक घेऊन, योग्य प्रमाणानें चुना, कात, वेलची, लवंग, जायपत्री वगैरे सुवासिक पदार्थ घालून मोठ्या काळजीनें तयार केलेला विडा पतीच्या हातीं द्यावा. नंतर विष्णुपंतांनीं कपडे करून आफिसांत जाण्याकरितां गोविंदरावांची वाट पाहात आरामखुर्चीवर पडावें. येणेंप्रमाणें त्यांचा नित्यक्रम चालत असे. आपल्या प्रिय भार्येचें हें प्रेमळ आचरण पाहून विष्णुपंत आपल्याला धन्य मानीत होते.

सायंकाळींहि नेहमीं असाच क्रम चाले. विष्णुपंत आणि गोविंदराव आफिसांतून सुटल्यावर बरोबरच येत व बरीच रात्र होईपर्यंत इकडल्या तिकडल्या गप्पा मारीत बसत. इतक्यांत इकडे आनंदीबाईच्या स्वयंपाकाची तयारी होई. सात साडेसात होतांच घरांत पाटपानें मांडून जेवण्याकरितां ती नवऱ्यास हांक मारी व केव्हांकेव्हां बरोबर गोविंदरावांसहि जेवावयास उठण्याविषयीं आग्रह करी. असा

क्रम हरहमेश चालला होता. आनंदीबाई आपल्या पतीप्रमाणेंच गोविंदरावांचीहि मनोभावें सेवा करून त्यांचें मन प्रसन्न राखी.

आनंदीबाईसारखें सद्गुणी भार्यारत्न आपल्याला लाधलें याबद्दल विष्णुपंत नेहमीं संतुष्ट असून देवाचे उपकार मानीत. गोविंदरावहि मनांत ह्मणत “ धन्य आहे माउली तुझें प्रेम ! स्त्रीजातीच्या सत्कीर्तीला शोभा देणारें तूं एक रत्न आहेस ! ईश्वर तुला सुखी करो आणि तुझ्यासारखी सुलक्षण भार्या सर्वांला लाभो ! ” ते आनंदीबाईला याप्रमाणें मनांतून आशीर्वाद देत, परंतु स्वतः त्यांचें अंतःकरण नेहमीं खिन्न असे.

आनंदीबाईचें विष्णुपंतांवर जेवढें प्रेम होतें तेवढेंच किंबहुना त्याहूनहि कांकणभर जास्त विष्णुपंतांचें आनंदीबाईवर होतें. उभयतां एकमेकांस प्रति ईश्वरच समजून पूज्यबुद्धीनें वागत असत. आपल्या प्रिय पत्नीच्या प्रत्येक कृत्यापासून विष्णुपंतांच्या मनाला समाधान होई. दुःख किंवा क्लेश यांचें नांव, आनंदीबाईशीं संबंध जडल्यापासून विष्णुपंतांस कधींहि ठाऊक नव्हतें. या पुण्यशील दंपत्याचा याप्रमाणें आनंदानें काळ जात होता; परंतु गोविंदरावांच्या संसाराची स्थिति याच्या अगदीं उलट होती.

गोविंदराव कोंवळ्या मनाचे मनुष्य होते, परंतु त्यांची स्त्री यशोदाबाई मूर्तिमंत कृत्या होती. टोमणे, वर्मी भाषणें व दुसऱ्या हरेक प्रकारांनीं ती कैदासीण गोविंदरावांच्या काळजास घरे पाडी. गोविंदराव सुशिक्षित आणि समंजस असल्यामुळें, ते कुलीन स्त्रीचें आचरण कसें असलें पाहिजे, तिनें कसें वागतां कामा नये, वगैरे बोध यशोदाबाईला नेहमीं करीत; परंतु सारें उपड्या घड्यावर पाणी ! एक नाहीं, दोन नाहीं, होते तेवढे सर्व उपाय आणि तरतऱ्हा

करून पाहिली, परंतु कुत्र्याचें शेपूट कांहीं केल्या सरळ ह्मणून होत नाहीं असें जेव्हां त्यांनां आढळून आलें, तेव्हां त्यांनीं बायकोचें नांवच सोडून दिलें. कारण, त्यांनां सर्वांपेक्षां अब्रूची चाड विशेष होती. डोळे मिटून चालला आहे हा प्रकार निमूटपणें चालूं द्यावा, असा त्यांनीं आपल्या मनाचा निर्धार केला.

एक दिवस आनंदीबाईनीं गोविंदरावांनां आपल्या येथें जेवावयास येण्याविषयीं आग्रहपूर्वक आमंत्रण दिल्यावरून ते नऊ वाजतांच विष्णुपंतांच्या घरीं हजर झाले. भोजनाची तयारी होतांच उभयतां मित्र पाटावर जाऊन बसले. दोघेहि जेवायास बसले असतां आनंदीबाईनीं असा कांहीं गोष्टीचा भाग काढला, कीं, त्या गोष्टीच्या नादांत अर्धा पाऊण तास केव्हांच निघून गेला व आनंदांत जेवणहि मोठें मिष्ट लागलें. या दिवशीं रविवार असल्यामुळें अर्थातच आफिसांत जाण्याची घाई नव्हती. सर्व प्रकार संथपणें चालला होता. भोजन उरकतांच मुखशुद्धीकरितां आनंदीबाईनीं पानाचे दोन विडे तयार करून हास्यमुखानें उभय मित्रांच्या हातीं दिले. ते तोंडांत टाकून चावीत चावीत दोघेहि दिवाणखान्यांत गेले व इकडे आनंदीबाई जेवावयास बसल्या. पाव तासाच्या आंत भोजन आटोपून आनंदीबाईनें ताटें उचललीं, उष्ट्यांस शेण लावलें व खरखटीं भांडीं घांसण्याकरितां मोरींत ठेवून इकडे दिवाणखान्यांत आपल्या पतीला व गोविंदरावांला कांहीं हवें नको असल्यास तें समजून घेण्याकरितां ती सादर झाली. विष्णुपंत आणि गोविंदराव दिवाणखान्याच्या मध्यभागीं टांगलेल्या हिंदोळ्यावर प्रेमभरांत गोष्टी बोलत बसले होते. आपल्या प्रिय भार्येस जिन्यांत चढत असलेली पाहून विष्णुपंतांनीं पिण्याकरितां थोडें गार पाणी मागितलें. आनंदीबाई पतीच्या आज्ञेप्रमाणें तत्क्षणीं

गार पाण्यानें भरलेला एक लखलखीत तांब्या व स्वच्छ चांदीचा पेला घेऊन आली व उभी राहिली. विष्णुपंतांनीं गोविंदरावांस अगोदर दे, असें सांगतांच तिनें प्याला भरून गोविंदरावांच्या पुढें केला परंतु त्यांनीं आपल्याला नको आहे असें ह्मणतांच विष्णुपंतांनीं तो घेतला व तोंडास लावून ते घटघटां पिऊं लागले.

आनंदीबाईचें लावण्य या प्रसंगीं किती अपूर्व शोभा देत होतें ! पाहणारांचे नयन किती रंजवित होतें ! तिनें अंगावर एकदोनच दागिने घातले होते. हातांत सोन्याच्या बांगड्या, गळ्यांत ठुशी आणि एक सुवर्णमण्यांचा हार; कानांत पाणीदार मोत्यांचीं कुडीं व नाकांत नथ एवढेच कायते दागिने या वेळीं तिच्या अंगावर होते. कुसुंबी रंगाचें नागपुरी रेशीमकांठी बारीक लुगडें ती नेसली होती, आणि खरोखर तें तिच्या गौर वर्णाला अनुपम शोभा देत होतें. जणों विष्णूची लक्ष्मी किंवा रामचंद्राची सीताच दुसरी अवतरली आहे, असा पाहणारास भास होई.

आपल्या प्रिय पत्नीकडे प्रेमभरानें पहात विष्णुपंतांनीं पेला तोंडास लावला, तोंच ठसका लागून तोंडांतील विडा व थुंक यांनीं मिश्र अशुद्ध आणि लाल रंगाचें पाणी एकदम बाहेर उडालें व तें विष्णुपंतांच्या अंगावर, तोंडावर व समोर पाण्याचा तांब्या घेऊन उभ्या असलेल्या आनंदीबाईच्या सर्वांगावर सांडलें. हा प्रकार पाहतांच आनंदीबाई घाबऱ्याघुबऱ्या होऊन त्यांनीं हातांतील तांब्या एकदम बाजूला ठेविला व आपल्या लुगड्याच्या पदरानें विष्णुपंतांच्या अंगावर पडलेले विड्याच्या थुंकीचे डाग आणि पाणी पुसून काढून तोंड पुसून चांगलें स्वच्छ केलें. विष्णुपंत ह्मणाले "राहूं दे ! तुझें लुगडें खराब होईल."

"जळलं मेलं लुगडं. हें सोन्यासारखं तोंड म्लान झालं, त्याहून या दीडदमडीच्या चिंधीची मातब्बरी ती कसली ?"

आनंदीबाईचें असें हें प्रेमळ भाषण आणि तिचें नवऱ्याविषयींचें अत्यंत प्रेम पाहून जवळ बसलेल्या गोविंदरावांनां फार समाधान वाटलें. ते मनांत ह्मणूं लागले " माउली, धन्य आहेस तूं आणि तुझें जीवित ! खरी पतिव्रता स्त्री तूंच आहेस. तूं जन्म घेतल्याचें सार्थक केलेंस. खरोखर, तूं देवी आहेस, मनुष्य नव्हेस ! तूं तुझ्या पित्याच्या आणि सासरच्या कुळाचा उद्धार केलास. देव तुझें अक्षय कल्याण करो."

अशा आनंदांत लीन झालेले गोविंदराव, बराच उशीर झाल्यामुळें घरीं जावयास निघाले. विष्णुपंतांच्या घरून निघतेवेळचा त्यांचा आनंद रस्त्यामध्यें फार वेळ टिकला नाहीं. पांचएक मिनिटें लोटण्यापूर्वींच ते शोकसमुद्रांत गटंगळ्या खाऊं लागले ! त्यांनां कोणीं मारिलें नव्हतें, किंवा रस्त्यांत चोरांनीं लुटलें नव्हतें. त्यांनां शोकसागरांत ढकलून देणारी त्यांची स्त्री यशोदाबाईच होती. गोविंदराव बाहेर विद्वानांत मोडले जात ! परंतु घरामध्यें त्यांची विद्वत्ता आणि चातुर्य फिकें पडे !

विष्णुपंतांच्या घरीं बराच उशीर झाला असल्यामुळें आपल्या कुटुंबाकडून आतां काय पुष्पवृष्टि होते कोण जाणे, या दहशतीनें या वेळीं त्यांच्या मनांत काहूर उडवून दिलें. ते वारंवार मनांत ह्मणत "हाय हाय ! किती मी अभागी ! ही दुष्ट कैकया माझ्याच नशिबीं कशी पडली ? जगांत सर्व मजसारखेच दैवहीन असतील काय ? छे छे ! विष्णुपंतांची सुशील पत्नी आनंदीबाई किती सत्वशील स्त्री आणि ही अवदसा—"

मनामध्यें अशा प्रकारचा विचार करीत करीत खिन्न मुद्रेनें गोविंदराव घरीं येऊन पोहोंचले. दाराची पायरी चढण्याबरोबर, एखाद्या चवताळलेल्या वाघिणीप्रमाणें एकेक डोळा फाडून दरवाजांत उभी असलेली यशोदाबाईची मूर्ति त्यांच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर त्यांचें मस्तक खवळून गेलें. त्यांनां अति संताप चढला. तरी ते कांहींएक न बोलतां निमूटपणें आंत गेले. "घरीं येऊन काय करायचं होतं ? तिथंच बसायचं होतं सारा दिवस ! दोन वाजून गेले—कांहींतरी मेला सुमार ! त्या सटवी—"

शिव शिव ! कानांनीं ऐकूंहि नयेत असे भलभलते शब्द आणि भलभलते प्रहार गोविंदरावांवर करून ती दुष्ट स्त्री जणूं काय तापलेल्या सांडसांनीं त्यांचें काळीज तोडूं लागली. गोविंदरावांच्या जागीं दुसरा कोणी तामसी पुरुष असता, तर प्रसंगीं भयंकर रण माजून खूनहि पडले असते ! परंतु गोविंदराव फार शांतस्वभावी आणि दूरवर नजर पुरविणारे असल्यामुळें "प्राक्तन आपलें, पूर्व-संचिताचाच असा संस्कार असेल," असें मनाचें समाधान करून कांहींएक उत्तर न करितां मस्तकावर हात टेंकून स्वस्थ बसले व ती कृत्या जें जें कांहीं बरळत होती तें तें त्यांनीं निमूटपणें सोसून घेतलें.

केव्हां केव्हां यशोदाबाईची तब्यत खुष असे व अशा प्रसंगीं गोविंदरावांनां मोठा संतोष होई. विष्णुपंतांच्या घरचा त्या दिवसाचा तो भोजनाचा थाट, आनंदीबाईची ती टापटीप, विवेक, नवऱ्याविषयीं निष्कपट प्रेम इत्यादि गोष्टी गोविंदरावांच्या मनांत अहोरात्र एकसारख्या घोळत होत्या व अशा सुखाचा आस्वाद आपणहि घरीं एकदा चाखावा, अशी त्यांनां मोठी उत्कंठा लागली होती. बाईसाहेबांची तब्यत खुषींत आहे अशी संधि पाहून एक

दिवस गोविंदराव बाजारांत गेले व भाजीकरितां पडवळ, पुऱ्यांसाठीं सुरेख रवा, दोन शेर दूध, शेरभर तूप, गूळ, साखर व दुसरे कांहीं जिन्नस खरेदी करून घरीं आणून त्यांनीं ते यशोदाबाईच्या हवालीं केले. आपण सांगितलें नसतां वरील जिन्नस घरीं आलेले पहातांच यशोदाबाईची तब्यत एकदम गरम झाली व डोळे लाल करून त्यांनीं विचारलें "आज कांहीं मामंजीचं श्राद्ध आहे वाटतं, हें सामान घेऊन आलां ते?"

बायकोचें हें भाषण ऐकतांच गोविंदरावांच्या पायांची तिडीक मस्तकास पोहोंचली; परंतु राग आंतल्याआंत गिळून ते ह्मणाले "ह्या पडवळांची भाजी करायची, दूध तापवायचें आणि रव्याच्या पुऱ्या करायच्या! आज सणाचा दिवस आहे ह्मणून हें मुद्दाम आणलें आहे."

"सण कायतो तुमच्याच घरीं! दुसऱ्यांच्या घरीं जसा कांहीं सणवार नसतोच? ही मेली महाग भाजी आणल्याशिवाय सण आहे हें कसं कळेल!"

चडफडत चडफडत यशोदाबाईनीं एकदाची भाजी चिरली, दूध चुलीवर ठेविलें आणि त्या पुऱ्या लाटावयास बसल्या. इतक्यांत राधाकृष्ण तिला भेटावयाला ह्मणून आला. ही स्वारी कोण होती हें अगोदर येथें सांगितलें पाहिजे. यशोदाबाईचे हे मावसभाऊ असून यांचें अध्ययन विकटोपर्यंत झालेलें होतें! अंगानें मात्र रावणासारखे दांडगट असत. अंगीं योग्यता फार, यामुळें यांनां बल्लवगिरीचा—आचार्याचा—धंदा पसंत करावा लागला होता व आपले मेहुणे गोविंदराव यांच्या ओळखीनें बडोद्यास नारायणराव ह्मणून एक हास्पिटलावरचे मुख्य डाक्तर असत त्यांजकडे स्वयंपाक्याची जागा

मिळविली होती. यशोदाबाईचे हे प्रत्यक्ष मावसभाऊच असल्यामुळें वारंवार गोविंदरावांच्या घरीं यांचें आगमन होत असे, व यशोदाबाईचें त्यांच्यावर प्रेमहि पण तसेंच असे. डाक्तरसाहेब कोणा रोग्यास पहाण्याकरितां बाहेरगांवीं गेले असल्यामुळें राधाकृष्णांनीं यजमानिणीकडून एका दिवसाची रजा घेऊन ते आज बहिणीला भेटावयाला आले होते. भावंडांची भेट होतांच दोघांनांहि अतिशय आनंद झाला, व गोष्टींचा तडाका सुरू झाला.

गोष्टींच्या नादामध्यें यशोदाबाईनें चुलीवर ठेवलेली भाजी करपून गेली. वैलावरील दुधावर झांकण नसल्यामुळें त्यास ऊत येऊन तें बाहेर सांडलें व जें कांहीं थोडेंसें भांड्यांत उरलें होतें तेंहि चूल नळीनें वारवार फुंकित असल्यामुळें तींतील उडालेल्या राखेनें भरून गेलें. पुऱ्यांचीहि स्थिति सदरप्रमाणेंच झाली होती. सरासरी तीन-चार तासांत वरील पक्वान्नें तयार झाल्यावर गोविंदराव स्नान करण्यास उठून "जरा तो पंचा आणि टुवाल इकडे घे बघूं," असें यशोदाबाईला ह्मणाले.

त्याबरोबर "काय मेली मिजास तरी! समोरच्या दांडीवरून पंचा ओढून घ्यायला पाय मोडलेच जसे!" अशीं मुक्ताफळें बाहेर पडलीं.

गोविंदरावांनीं टुवाल, पंचा स्वतः घेऊन स्नान आटोपून ते माजघरांत आले. तेथें येतात तों कशास कांहीं ठिकाण नाहीं! तें पाहून ते ह्मणाले "जरा पाट तरी ठेवशील कीं नाहीं? संध्येकरितां तांब्या पंचपात्री दे. असें काय मांडलें आहेस तूं हें?"

" ओ–हो–हो! पाटावांचून नाहींच चालत वाटतं? जरा तांब्या भरून घेतला तर हात मोडणार नाहींत कांहीं अगदीं! आज काय चोंचले आठवताहेत पण हे! लोकांच्या घरचीं सोंगंढोंगं पाहून यायचं

झालं असेल ! पण माझ्याकडे नाहीं चालायचे बरं हे असले चाळे ! सटव्या नखरे करतात नखरे ! " असें बोलून दण्‌दिशीं पाट आपटून व तांब्या उंचावरून आदळून "बसा यावर," असें ओरडली. महाभाग्य त्या नवऱ्याचें, कीं, आणखी कांहीं शेलापागोटें न मिळतां ताटामध्यें भोजनाचे पदार्थ येऊन पडले. पंक्तीस आमचे राधाकृष्णहि होतेच ! गोविंदरावांनीं जेवण्याला आरंभ केला. बाईसाहेबांनीं मोठ्या कुशलतेनें तयार केलेलीं पक्वान्नें गोविंदराव मोठ्या आवडीनें सेवन करीत असतांना वारंवार ते भाजी तपासूं लागले, दूध हालवून पाहूं लागले आणि मनांत आपल्या भार्येची तारिफ करूं लागले !

तिखटजाळ आमटीपुढें राखेनें भरलेल्या दुधाची रुची त्यांनां बरोबर कळेना ! खारटघोट भाजीपुढें कच्च्या पुऱ्यांची गोडी समजेना ! एवंच त्यांची त्रेधा उडाली ! 'थु-थु-थु-थु फुःफुःफुः अ—स्स—हाय अस्स्स हाय' करीत एकदाचे जेवून उठून यशोदाबाईला त्यांनीं प्रेमानें ह्मटलें "जरा विडा तरी करून दे."

विडा करण्याची तरी अक्कल पाहिजे कीं नाहीं ! आठ शेर चुना तर पाव खंडी कात भरलेला तांबूल जळफळत जळफळत गोविंदरावांच्या हातीं पडला. त्यांनीं तो तोंडांत घालतांच थुंकून टाकून ते दिवाणखान्यांत आरामखुर्चीवर जाऊन पडले. सुमारें तास दीड तास लोटल्यावर यशोदाबाई बाहेर आली, तेव्हां गोविंदरावांनीं पाणी मागितलें. सुदैव ह्मणावयाचें कीं, कांहींएक न बोलतां यशोदाबाईनें आंतून पाणी आणून गोविंदरावांनां दिलें. मघांपासूनच्या एकंदर प्रकारावरून शहाणें व्हावयाचें सोडून देऊन गोविंदरावांनां त्या वेळीं काय लहर लागली कोण जाणे, आपल्यास

ठसका लागला असा बाहणा करून त्यांनीं तोंडांतील घोट बाहेर उडविला व त्याचे शिंतोडे यशोदाबाईच्या तेलिणीसारख्या सवा-तीन खंडी मळ सांचलेल्या लुगड्यावर उडाले. अरे बापरे ! त्या वेळची तिची काय क्रुद्ध मुद्रा ती ! मूर्तिमंत नागीणच जशी ! तिच्याकडे कोण पाहील ! अंगावर शिंतोडे उडतांच "मेल्याचे सकाळपासून ढंग पहात्यें आहें—भांगबींग पिऊन आला असेल मेला ! तुझं जळलंरे तें तोंड—" व या पलीकडीलहि शब्दभांडार खुलें करून हातांतील नाशिकचा पाण्याचा गडू तिनें जोरानें गोविंदरा-वांच्या कपाळांत घातला, आणि "अरे राधाकृष्णा, धावरे !" अशी आरोळी ठोकली.

बहिणीची भीतिजनक आरोळी ऐकतांच तिला कोणीं मारिलें असें समजून दैत्यासुर राधाकृष्ण हातांत भला मोठा सोडगा घेऊन धावत आला व तांब्याच्या मारामुळें कपाळावर भयंकर खोंक पडून रक्तबंबाळ झालेल्या बापड्या अभागी गोविंदरावांवर हीं दोघें भावंडें, भुकेनें चवताळलेल्या अस्वलासारखीं तुटून पडून, उभयतांनीं मिळून बिचाऱ्याचें हाडनूहाड मऊ केलें. त्यांच्या घरची ही आरडाओरड ऐकतांच आसपासचे लोक धावून आले व एकच गलबला झाला. जो तो या दंपत्याच्या लीलेचें आश्चर्य करूं लागला. यशोदाबाईची कीर्ति हां हां ह्मणत सर्व गांवभर पसरली.

विष्णुपंत आणि आनंदीबाई यांच्या कानीं ही दुर्वार्ता जातांच तींहि लगबगीनें धावून आलीं व गाडी करून त्यांनीं गोविंदरावांनां आपल्या घरीं नेलें. ते बिचारे बेशुद्ध होऊन पडले होते. घाईघाईनें डाक्तरला बोलावून आणून त्याच्याकरवीं विष्णुपंतांनीं गोविंदरावांची जखम धुववून तींत मलम वगैरे भरविलें व त्यांनां शुद्धीवर आण-

ण्याचे प्रयत्न चालविले. उभयतां नवराबायकोनीं अहोरात्र जीवापाड मेहनत घेऊन गोविंदरावांची एकसारखी शुश्रूषा चालविली. त्यांच्या कळकळीच्या जोपासनेनें आणि डाक्तराच्या दीर्घ प्रयत्नांनीं, तीन दिवसांनंतर गोविंदराव सावध झाले व त्यानंतर त्यांनीं आपली इत्थंभूत कर्मकथा त्या दोघांनां सांगितली. ती ऐकून त्यांनां यशोदा-बाईचा अत्यंत तिटकारा आला.

पुढें घडावयाचा तोच प्रकार घडला. "नको या चांडाळणीचें यापुढें दर्शन आणि नांवहि !" असा मनांत निर्धार करून गोविंद-रावांनीं आपल्या कजाग बायकोचा त्याग केला. यशोदाबाईच्या पोटापाण्याचे नंतर फार हाल होऊं लागले. तिच्या दुष्ट वर्तनामुळें गांवांतील कोणाएकासहि तिची दया आली नाहीं. तिची स्थिति अत्यंत शोचनीय झाली. तिला नंतर पुष्कळ पश्चात्ताप झाला व ती नवऱ्याच्या पुष्कळ विनवण्या करूं लागली; परंतु "चांडाळणी ! इतःपर मला तुझें तोंडहि दाखवूं नकोस !" असें ह्मणून गोविंद-रावांनीं तिचा धिक्कार केला; तिला पुन्हा घरांत ह्मणून कांहीं घेतलें नाहीं. ती एकसारखी रड रड रडली व एक दिवस विहिरींत उडी टाकून देहापासून मुक्त झाली !

कुसुम बेटा ! आर्या आणि अनार्या स्त्रीमध्यें कितीतरी अंतर असतें. आर्येच्या सदाचरणामुळें खुद्द तिला स्वतःला, तिच्या भर्त्याला आणि एकंदर समाजाला कसें सुख होतें, सर्वजण तिची कशी वाहवा गात असतात, त्याप्रमाणें अनार्या स्त्रीच्या कुवर्तनापासून तिच्या पतीला, लोकांला आणि अंतीं तिला कसकसें दुःख आणि यातना सोसाव्या लागतात व सर्व लोकांकडून तिची कशी विडंबना आणि छी थू होत असते, हें तुला या आर्या आणि अनार्या यांच्या

गोष्टीवरून कळून आलें असेलच. बेटा! तूं ही गोष्ट आणि हिचें तात्पर्य पक्कें ध्यानांत बाळगून सदाचरणानें वागण्याचा प्रयत्न कर व तुझ्या भगिनींनां आणि इष्टमैत्रिणींनां तूं हाच उपदेश कर, ह्मणजे परिणामीं तुझें व तुझ्या भगिनींचें खरोखर कल्याण होईल."

कुसुमकुमारी ह्मणाली "माई, आपल्या दर्शनाचा मला लाभ झाला, हें मी खरोखर माझें महद्भाग्य समजतें. आपल्या विद्वान् पतीनं आपल्याला दिलेलं पुस्तक मला वाचावयास मिळालं असतं, तर बरं झालं असतं. त्यांतील एकेक गोष्ट आपल्या मुखांतून ऐकून हृदय आनंदानं कसं भरून जातं. आपल्याला आठवत असल्यास त्यांतील आणखीहि अशीच एखादी उपदेशपर गोष्ट सांगण्याची कृपा करावी, अशी माझी आपल्या चरणांपाशीं नम्र विनंति आहे."

संन्यासिनी ह्मणाली "बेटा, त्या पुस्तकांत स्त्रियांनां एकाहून एक सुंदर अशा अनेक उपदेशपर गोष्टी लिहिल्या होत्या व त्या सर्व मीं पुनःपुनः वाचल्यामुळें जरी मला आठवत आहेत, तरी त्या सांगूं गेल्यास माझी मुख्य गोष्ट तशीच राहील. ह्मणून त्यांतील फक्त 'भामाकृष्णासंवाद' तेवढा तुला सांगून मी माझ्या गोष्टीकडे वळतें."

प्रकरण तेरावें.

## भामाकृष्णासंवाद.

पांडव वनवासांत असतांना त्यांनां भेटण्यासाठीं ह्मणून एकदा काम्यक वनामध्यें श्रीकृष्ण सत्यभामेसहवर्तमान आले. पुष्कळ दिवसांनीं द्रौपदी आणि सत्यभामा या दोघी मैत्रिणींची भेट झाल्यामुळें परस्परांनां अत्यंत आनंद झाला. त्यांच्या बराच वेळपावेतों कुरुवंशासंबंधीं आणि यदुवंशासंबंधीं सुखदुःखाच्या अनेक गोष्टी झाल्यावर कृष्णाची प्रिय पट्टराणी सत्यभामा द्रौपदीला ह्मणाली "सखी द्रौपदी ! तूं कोणत्या आचरणानें तुझ्या या अशा लोकपालतुल्य, वीर्यशाली, पराक्रमी आणि परस्परांवर अत्यंत प्रेम करणाऱ्या पंचपति पांडवांनां आपल्या वचनांत ठेवीत आहेस? आणि हे कल्याणि ! तुला ते वश राहून तुझ्यावर क्रुद्ध कसे होत नाहींत? हे प्रियदर्शने ! पांडवांचें तुझ्यावर असें निस्सीम प्रेम कशामुळें जडलें आहे? त्याचें खरेंखरें कारण मला सांग. हे पांचालि ! माझा प्रिय भर्ता कृष्ण, ज्याच्यायोगें नेहमीं माझ्या इच्छेप्रमाणें वागणारा होईल, आणि तुझ्या पतींचें जसें तुजवर प्रेम आहे तसें ज्याच्यायोगें माझा पति माझ्यावर प्रेम करील, असें कांहीं व्रताचरण, जपतप, मंत्रतंत्र, औषधअंगारा अगर दुसरें कांहीं एखादें साधन तुला ठाऊक असल्यास कृपा करून मला सांग."

सत्यभामेचें हें भाषण ऐकून पतिव्रता द्रौपदी ह्मणाली "भद्रे सत्यभामे ! तूं हें असाध्वी स्त्रियांचें वर्तन मला विचारीत आहेस.

या प्रश्नाचें उत्तर मी तुला काय देऊं? तुझा हा खरोखर प्रश्न असो, अगर तूं आपली माझें मन पाहण्यासाठीं उगीच विचारीत अस, परंतु असा प्रश्न करणें तुला मुळींच शोभत नाहीं. तूं विचारी असून कृष्णाची प्रिय पट्टराणी आहेस. सत्यभामे! आपल्याला वश करून घेण्यासाठीं आपली स्त्री मंत्रतंत्रांच्या आणि औषधअंगाऱ्यांच्या मागें लागली आहे असें कळतांच, सर्प असलेल्या घरांत वास करणाऱ्या मनुष्याप्रमाणें पतीच्या मनाला नेहमीं उद्विग्नता प्राप्त होते; आणि त्याची मति उद्विग्न झाली असतां त्याला शांति कोठून होणार? आणि ज्याला शांति नाहीं, त्याला सुखप्राप्ति तरी कशी होईल? सारांश, स्त्रीला मंत्रतंत्रादिकांनीं पति कधींहि वश व्हावयाचा नाहीं. या मंत्रतंत्र, औषधादिकांच्या मागें लागल्यास प्रसंगीं भयंकर अनर्थहि घडण्याचा संभव आहे. कारण, यापासून पतीच्या शत्रूंनां दुष्ट रीतीनें आपलें वैर साधून घेण्याला मार्ग मिळतो. पतीचे शत्रु, भोळ्याभावड्या स्त्रियांनां या मंत्रतंत्रांच्या आणि औषधअंगाऱ्यांच्या नादीं लागणाऱ्या ढोंगी लोकांनां वश करून घेऊन त्यांच्याकडून विषारी चूर्ण देववून स्त्रीच्याच हातून तिच्या पतीचा वध करवितात, अशीं अनेक उदाहरणें आढळांत आहेत. स्त्रिया पतीला नकळत पतीच्या खाण्यापिण्याच्या पदार्थांतून हीं विषारी औषधें घालीत असल्यामुळें तीं त्यांच्या पोटांत गेल्यानें, आणि विषारी अंगारे पतीच्या अंगाला लाविल्यानें, निःसंशय भयंकर परिणाम घडत असतात. या मंत्रतंत्र, औषधअंगाऱ्यांच्या मागें लागलेल्या कैक स्त्रियांनीं आपल्या अज्ञानामुळें बिचाऱ्या आपल्या निरपराध पतींनां रोगी, कुष्ठी, जराग्रस्त, अंध, बधिर वगैरे वगैरे नाना व्याधींनीं ग्रस्त करून टाकिलें आहे. यासाठीं आपल्या पतीला परिणामीं अहित

कर होणारी गोष्ट पतिव्रता स्त्रीनें कसाहि दुर्धर प्रसंग आला तरी कदापिहि करूं नये. हे यशस्विनी ! मीं असें हें असाध्वी स्त्रीचें आचरण आजन्मांत कधीं केलें नाहीं. माझ्या पतींशीं मी कसें आचरण ठेवीत आलें आहें, तें मी तुला सांगतें. मी कामक्रोधादि षड्रिपूंनां दूर हांकून लावून ईर्ष्येचा संहार करून आणि गर्वाचा विध्वंस करून सदोदित दक्ष राहून पांडवांची एकनिष्ठपणें सेवा करीत असतें. सवतीसंबंधीं मनांत मत्सर न धरतां व कसल्याच प्रकारच्या अभिमानास अंतःकरणांत थारा न देतां जेणेंकरून पतीचें मन नेहमीं स्थिर राहील, अशा रीतीनें मोठ्या प्रेमानें त्यांची शुश्रूषा करितें. मुखावाटे कधींहि कुत्सित शब्द उच्चारीत नाहीं. कधींहि आणि कोणाकडेहि कुत्सित दृष्टीनें पहात नाहीं; व कुत्सित नेत्रकटाक्ष प्रेरीत नाहीं; कुत्सित रीतीनें बसणें, कुत्सित रीतीनें उभें रहाणें, कुत्सित रीतीनें शयन करणें, हें मला कधींहि रुचत नाहीं. माझ्या प्रत्येक वर्तनाबद्दल, प्रत्येक आचरणाबद्दल, पतींच्या मनांत कधींहि अनादर उत्पन्न होऊं नये, अशाविषयीं मी फारच काळजी बाळगून त्यांचें चित्त सदा संतुष्ट राहील, अशा रीतीनें वागून त्यांची मनोभावानें सेवा करितें. बहुमूल्य वस्त्रालंकारांनीं विभूषित झालेला, तरुण, रूपसंपन्न, श्रीमान् असा कोणी देव असो, गंधर्व असो, मनुष्य असो, माझ्या पतीशिवाय अन्य पुरुष माझ्या मनामध्यें कधींच येत नाहीं. पतीनें भोजन केल्याशिवाय मी कधींहि जेवीत नाहीं, पतीनें शयन केल्याशिवाय मी कधींहि निजत नाहीं, पति एखाद्या कार्यांत गढून गेले असतां मी आळशासारखी रिकामी बसून रहात नाहीं, कांहींतरी गृहकृत्य करण्यांत गढलेली असतें. पति बाहेरून थकूनभागून घरीं येतांच आदरपूर्वक त्यांनां दाराशीं

सामोरें जाऊन हस्तपादप्रक्षालनासाठीं उदक देऊन प्रसन्न मुद्रेनें त्यांनां सुखासनावर बसवितें व त्यांचे शीण कमी करण्याच्या प्रयत्नाला लागतें. घर नेहमीं झाडूनलोटून स्वच्छ ठेवितें; भांडींकुडीं घांसून-पुसून लख्ख करितें; भोजनसामुग्री निर्मळ, व्यवस्थित आणि पहा-तांच आनंद होईल अशा रीतीनें ठेवितें; शुचिर्भूत होऊन स्वच्छ-पणें अन्न शिजवून वेळच्या वेळीं पतीला भोजन वाढितें. अंतःकरण दुसरीकडे जाऊं लागलें असतां नेहमीं त्याचें संयमन करितें. घरां-तील एकंदर वस्तु जागच्याजागीं आणि स्वच्छ ठेवून धान्यादिकांचा मोठ्या काटकसरीनें खर्च करितें. तिरस्कारयुक्त भाषण कधींहि करीत नाहीं. आणि दुष्ट स्त्रियांची संगति कधींहि धरीत नाहीं. आळस कधींहि येऊं देत नाहीं व पतीला हितकर आणि अनुकूल असेंच आचरण नेहमीं आचरीत असतें. विनोदप्रसंगाशिवाय मी कधींहि हंसत नाहीं. वारंवार दारामध्यें अगर खिडकीमध्यें कधींहि उभी रहात नाहीं. पतीशिवाय बागेमध्यें व इतर रम्य स्थळीं कधींहि फार वेळ रहात नाहीं. अति हास्य, अति क्रोध नेहमीं वर्ज्य करितें. पतीपासून दूर रहाणें मला कधींहि प्रिय वाटत नाहीं. तथापि कांहीं विशेष प्रसंगानिमित्त जेव्हां पति प्रवासाला अगर दूर देशीं गमन करितात, तेव्हां मी वेणीमध्यें फुलें गुंफीत नाहीं, अलंकार धारण करीत नाहीं, आणि सुंदर वस्त्रें परिधान करीत नाहीं. व्रतस्थ राहून पतीचें नेहमीं कल्याण चिंतीत असतें. पति जें भक्षण करीत नाहींत तें मीहि भक्षण करीत नाहीं; पति जें प्राशन करीत नाहींत जें सेवन करीत नाहींत तें मीहि सेवन करीत नाहीं. सारांश, पतीला ज्या ज्या वस्तु वर्ज्य असतील, त्या त्या सर्व मीहि वर्ज्य करितें. हे भाग्यवति सत्यभामे! पतीच्या आज्ञेप्रमाणें मी नेहमीं मनोनिग्रह-

पूर्वक वागत असतें आणि पतीला प्रिय असणाऱ्या गोष्टी करून फारच शुचिर्भूत राहून पतीचें प्रिय व हित करण्याविषयीं सारखी दक्ष असतें. भिक्षा, बलि, श्राद्ध, गुरुजनांचा आदर, अतीतअभ्यागतांचा सत्कार, वगैरे जे जे कुटुंबधर्म माझ्या सासूनें मला पूर्वीं सांगून ठेविले आहेत, आणि यांशिवाय आणखीहि जे जे मला समजले आहेत, ते ते सर्व मी रात्रंदिवस मोठ्या तत्परतेनें करीत असतें; आणि सर्वदा नम्र, विनयशील राहून मनःपूर्वक नियमानें वागत असतें. स्वभावानें अत्यंत कोमल, सत्वशील, सज्जन आणि सत्यधर्मानें वागणारे असेच जरी माझे पति आहेत अशी माझ्या मनाची पक्की खात्री झालेली आहे, तथापि त्यांनां अत्यंत क्रुद्ध झालेल्या अशा एखाद्या वाघाप्रमाणें लेखून मी सावधान चित्तानें आणि सेवेंत यत्किंचितहि चूक न होऊं देतां मोठ्या दक्षतेनें त्यांची शुश्रूषा करीत असतें. पति हाच स्त्रीचा परमधर्म आहे, पति हेंच स्त्रीचें पूज्य दैवत आहे, पती हाच स्त्रीचा मुख्य आधार आहे, पतिविना स्त्रियांनां दुसरा कसलाहि आधार नाहीं, हा माझा वेदमंत्र आहे. अर्थात्, पतीला अप्रिय अशी कसलीहि गोष्ट प्राणांतींहि मी करीत नाहीं. पतीच्या आज्ञेबाहेर मीं कधींहि वागत नाहीं. पतीला सोडून मी कोणताहि पदार्थ भक्षण करीत नाहीं. सासूची कधींहि निंदा करीत नाहीं. सदोदित तिच्या आज्ञेप्रमाणें आणि मर्जीप्रमाणें वागत असतें. हे महाभाग्यवति सत्यभामे ! मी सर्व गोष्टींकडे लक्ष्य देऊन आपलें काम आस्थेनें करीत असल्यामुळें, आणि सदोदित आपल्या कामामध्यें तत्पर रहात असल्यामुळें व गुरुजनांची सेवाशुश्रूषा करीत असल्यामुळें माझे पति मला वश असतात. माझी सासू कुंती इची खाण्यापिण्यासंबंधीं, वस्त्रांपांघुरणांविषयीं मी काळजी

पूर्वक सेवाशुश्रूषा करीत असतें. प्रत्येक गोष्ट तिला विचारून तिच्या आज्ञेनेंच करीत असतें. तिच्या परवानगीवांचून मी वस्त्रालंकार परिधान करीत नाहीं, भोजनहि करीत नाहीं. सारांश, मी तिची कधींहि अवज्ञा करीत नाहीं. वनवासांत येण्याच्या पूर्वी धर्मराजाच्या घरामध्यें साठ हजार ब्राह्मण सुवर्णाच्या ताटांतून नित्य भोजन करीत असत. प्रत्येकाच्या सेवेला तीस तीस दासी ठेविलेल्या, अशा ऐशीं हजार गृहस्थाश्रम्यांचें पाळणपोषण राजा युधिष्ठिर करीत होता. याशिवाय दहा हजार यतींनां दररोज मिष्टान्नभोजन देण्यांत येत होतें. या सर्वांनां प्रथम भोजन देऊन त्यांची पूजा करून ते तुष्ट झाल्यावर नंतर मी भोजन करीत असें. युधिष्ठिराच्या सेवेला नानाविध बहुमूल्य वस्त्रालंकारांनीं शृंगारलेल्या, परमरूपलावण्यसंपन्न, नृत्यगानविशारद अशा एक लक्ष दासी सर्वदा तत्पर असत. या सर्वांचीं नांवें, प्रत्येकीला नेमून दिलेलें काम, हीं मला ठाऊक असून त्या आपलें काम बरोबर करीत आहेत कीं नाहींत, याची चौकशी मी ठेवीत असें. आमच्या घरीं एक लक्ष दासी हातांमध्यें अन्नाचीं भांडीं घेऊन रात्रंदिवस एकसारख्या अतिथींनां भोजन वाढण्यांत गुंतलेल्या असत. सार्वभौम युधिष्ठिरराजा इंद्रप्रस्थ नगरीमध्यें वास्तव्य करीत असतांना त्याच्या स्वारीबरोबर नेहमीं एक लक्ष अश्व आणि एक लक्ष गज असत. अंतःपुरांतील त्याचप्रमाणें बाहेरील सेवक आपापलें काम योग्य रीतीनें करीत आहेत कीं नाहींत, हें सर्व मी लक्ष्यपूर्वक पहात असें व प्रत्येकाच्या कामावर बारीक नजर पुरवून त्याच्या त्याच्याकडून तें तें काम करून घेत असें. गुराखी, मेंढपाळांवरसुद्धां माझी नजर असे. हे यशस्विनी! सार्वभौम राजाची मी महिषी असतांना संपूर्ण राज्याचें वैभव केवढें

आहे, उत्पन्न काय आहे, खर्च कसा होत आहे, हें सर्व मला अवगत होतें. हे वीरकन्ये ! भरतवंशज श्रेष्ठ पांडव अस्त्रविद्या शिकण्यांत गढून गेल्या वेळीं सर्व कुटुंबाचा भार मलाच वहावा लागत होता, आणि मीहि तो असह्य भार सर्व सुखाचा त्याग करून मोठ्या दक्षतेनें वहात असें. वरुणाच्या खजिन्याप्रमाणें कुणालाहि लुटून नेतां न येणारा आणि सागराप्रमाणें रत्नभांडारांनीं परिपूर्ण असा माझ्या धर्मनिष्ठ पतींचा खजिना मला एकटीला माहीत होता. भूकतहान विसरून रात्र असो, दिवस असो, मी एकसारखी पतीच्या शुश्रूषेमध्यें तत्पर असतें व पतीचें आराधन करण्यांतच रात्र आणि दिवस कंठीत असतें. घरांतील सर्व मंडळीनें शयन केल्यावर नंतर मी शयन करितें व सर्वांआधीं उठून आपल्या कामाला तत्पर रहातें. सत्यभामे ! हाच माझा पति वश करून घेण्याचा उपाय आहे. मला हाच पतिवशीकरण मंत्र ठाऊक आहे, आणि हाच मी नेहमीं जपत असतें. याहून अन्य मंत्र मला ठाऊक नाहीं. असाध्वी स्त्रियांचें आचरण मीं कधींहि आचरिलें नाहीं, व आचरणार नाहीं!"

द्रौपदीचें हें भाषण ऐकून सत्यभामा विनयानें ह्मणाली "पांचालि ! मी तुझी क्षमा मागतें, मला माफ कर. मीं सहज विनोदानें तुला हा प्रश्न केला होता. मैत्रिणीशीं विनोद करणें यांत मोठासा अपराध नाहीं !"

द्रौपदी ह्मणाली " सखी ! पतीचें चित्त आपल्याकडे आकर्षून घेण्याचा खात्रीचा उपाय मी तुला सांगतें, तो तूं सावधान चित्तानें ऐक. त्या मार्गानें तूं जाऊं लागलीस ह्मणजे तुझ्या इतर सवतींपासून तूं आपल्याकडेच पतीचें चित्त आकर्षून घेशील. हे सुभगे ! तीनहि लोकांमध्यें स्त्रीला पतीसारखें अन्य दैवत नाहीं. पतिदैवता-

त्याच कृपाप्रसादानें स्त्रीचे सकल मनोरथ पूर्ण होतात आणि पति-दैवत कोपायमान झालें असतां स्त्रीचा घात होतो. संतानप्राप्ति, नाना प्रकारचे भोगविलास, सुखवैभव, वस्त्रें, अलंकार, मान, कीर्ति आणि उत्तम गति, हीं सारीं पतीपासून स्त्रीला प्राप्त होतात. सुखानें सुखाची प्राप्ति कधींहि होत नाहीं, तर दुःख, क्लेश सोशिल्यानेंच साध्वीला सुखप्राप्ति होत असते. यासाठीं हे सखी ! तूं नेहमीं मत्सररहित अंतःकरण करून स्वतःच्या देहाला कष्ट देऊन, सरळ वर्तन ठेवून, कृष्णाला सुखकर वाटतील अशा उपायांनीं प्रेमपूर्वक त्याचें रात्रंदिवस आराधन करीत रहा, ह्मणजे 'मी हिला प्रिय आहें' असें समजून तो तुझ्याशींच प्रेमानें राहील. कृष्ण दरवाजांत येतांच तूं आदरानें आणि विनयानें उभी राहून त्याला उत्थापन दे, आणि तो आंत येतांच त्याला सुखासनावर बसवून प्रेमळ भाषणानें आणि इतर उपायांनीं त्याचें मनरंजन कर. जवळ दासी नसल्यास तूं खोळंबून न रहातां कृष्णाची प्रत्येक हलकीसलकीसुद्धां सेवा मोठ्या उत्सुकतेनें करीत जा, आणि 'ही माझी शुश्रूषा अगदीं मनोभावानें करिते' अशी कृष्णाच्या मनाची खात्री होऊं दे. कृष्ण तुझ्यापाशीं जें कांहीं सांगेल तें जरी गुह्य नसलें, तरी तूं तें तुझ्याकडून बाहेर न फुटण्याविषयीं फारच खबरदारी घेत जा. कारण, तुझा मत्सर करणारी तुझी एखादी सवत वासुदेवाला तें सांगेल व त्यायोगें एखादे वेळीं तुझ्यावरून त्याचें मन उडेल. कृष्णाला जे कोणी प्रिय असतील, त्याचे जे मित्र असतील, जे त्याच्यावर खरें प्रेम करीत असतील, त्याच्या हिताविषयीं झटत असतील, त्यांनां तूं नाना उपायांनीं संतुष्ट राखीत जा; आणि कृष्णाला जे अप्रिय, त्याचे जे शत्रु, ज्यांचा तो तिरस्कार करीत असतो, जे लोक त्याचें अहित

करीत असतात, जे त्याच्याशीं कपटानें वागतात, त्यांच्यापासून तूं नेहमीं दूर रहा. परपुरुषांशीं वागण्याचा प्रसंग आला असतां तूं गर्व आणि गाफिलपणा अगदीं न दाखवितां मौन धारण करून मनोनिग्रहानें वागत जा. कधींहि अतिप्रसंग येऊं देऊं नको; आणि प्रद्युम्न आणि सांब हे जरी तुझे पुत्र आहेत तथापि त्यांच्याशीं व त्याचप्रमाणें तुला पुत्रवत् असणारांशींसुद्धां तूं एकांतांत कधींहि गोष्टी सांगत बसूं नकोस ! महा कुलीन, निष्पाप आणि पतिव्रता अशा स्त्रियांशींच तुझें सख्य असूं दे. क्रूर, उन्मत्त, अधाशी, चोर, दुष्ट आणि चंचल स्त्रियांच्या तूं वाऱ्यासहि उभी राहूं नकोस. सखी ! हा मीं तुला सांगितलेला पतिवशीकरण मंत्र तूं सदोदित निष्ठापूर्वक जपत जा. हा मोठा यशकारक, भाग्यकारक, सर्वार्थसाधक आणि शत्रुनाशक असा आहे. यास्तव नित्य ह्याचें अवलंबन करून बहुमूल्य वस्त्राभरणांनीं अलंकृत होऊन, पुष्पमाला, सुगंध, उट्या यांनीं युक्त होऊन तूं आपल्या पतीचें आराधन करीत रहा, ह्मणजे तुझे इच्छित मनोरथ आपोआप पूर्ण होतील."

प्रकरण चवदावें.

## मुंबईंत वकिली.

बुधवार, डिसेंबरची चोवीसावी तारीख, दुपारचे दोन वाजले होते. आह्मी सगळ्याजणी ओटीवर डाळतांदुळ निवडीत बसलों होतों. इतक्यांत तारआफिसाचा शिपाई पिंवळ्या रंगाचा एक लखोटा घेऊन आला. धाकट्या दिरानें तो घेऊन माडीवर मामंजीपाशीं नेऊन दिला. मामंजींनां इंग्रजी येत नव्हतें. सदोबा भावोजींनीं पुष्कळ खटपट केली, पण कांहीं वळेना! इतक्यांत नणंद मला किंचित् टोमणा मारून ह्मणाली "वैनी! तूं तर इंग्रजी शिकलीच आहेस. तेव्हां तारेंत काय लिहिलं आहे तें सांग पाहूं?"

मामंजींनीं उत्सुकतेनें कागद माझ्या हातीं दिला. मीं तो लाजत लाजत घेऊन वाचला. त्यांत पुढील शब्द होतेः— "Extremely happy, passed examination succssfully and stood first. परीक्षा पास होऊन नंबर पहिला आला."

तारेंतील वरील आनंददायक हकीगत माझ्या तोंडून ऐकतांच मामंजींनां आणि इतर सर्व मंडळीला अतिशय आनंद झाला. माझ्या मनाला त्या वेळीं जें कांहीं वाटलें, तें शब्दांनीं व्यक्त करवत नाहीं. मी आनंदानें वेडीच होऊन गेलें! तिकडची परीक्षा पहिल्या नंबरास उतरल्याबद्दल मामंजींनां मोठा आनंद झालाच; पण मला तार वाचावयाजोगें इंग्रजी येतें हें त्या वेळीं कळून आल्यामुळें त्याबद्दलहि त्यांनां तिकडच्या पास होण्याच्या आनंदाहूनहि अधिक आनंद

झाला. मला शाबासकी देऊन आजीबाईकडे वळून मामंजींनीं ह्मटलें "पाहिलेंसना त्याहावाचायला शिकल्याचा कसा फायदा होतो तो ? बायकांनां शिक्षण पाहिजे तें याकरितांच."

मामंजींच्या या प्रशंसेच्या शब्दांनीं मला मोठें समाधान वाटलें व मी लाजून खालीं मान घालून उभी राहिलें.

तिकडली वकिलीची परीक्षा पास झाल्याबद्दल सर्वांनां आनंद झाला. गांवांत साखर वांटण्यांत आली. आजेसासूंनीं दोन ब्राह्मणांनां जेऊंहि घातलें व माझ्यावर सगळींजणें पूर्वीपेक्षां अधिक प्रेम करूं लागलीं. लवकरच मुंबईंत वकिलीची सनद घेऊन कोर्टांत जाण्या-येण्याला सुरुवात झाली. पहिल्या नंबरास परीक्षा उतरणें कांहीं सामान्य गोष्ट नव्हती. अंगांत तशीच हुषारी होती. आणि त्यामुळें धंद्याला सुरवात करुण्याबरोबर कामेंहि एकसारखीं मिळूं लागलीं. सरकारांतून मुन्सफाची जागा पत्करण्याविषयीं लिहून आलें होतें, परंतु ती कांहीं पत्करणें झालें नाहीं. स्वतंत्रपणें धंदा करण्याची मुळापासून फार आवड. आणि देवानें त्यांत यशहि पण इच्छेप्रमाणेंच दिलें. लवकरच इंदुर संस्थानामध्यें एका खटल्यांत दरबारतर्फे बोलावणें आलें व त्यांत पूर्ण यश आणि बरेचसे पैसे मिळाले. तेथपासून तिकडची सर्वत्र ख्याति झाली व कामांचा ढीग येऊन पडूं लागला. वाढतां वाढतां काम इतकें वाढलें, कीं, बोलण्यालाहि फुरसत मिळेना.

मुंबईहून वारंवार पत्रें येऊं लागलीं, कीं, जेवणाखाणाचे फार हाल होतात, कोणींतरी मुंबईस लवकर यावें. तेव्हां मामंजींनीं आजेसासूं-बरोबर मला मुंबईस पाठविण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें तिकडे लिहिलेंहि. ता० ५ एप्रील बुधवार रोजीं, मालाच्या बोटी-

मध्यें बसून गुरुवारीं दुपारचे बारा वाजतां आह्मी गोदींत येऊन पोहोंचलों. या वेळीं कोर्टांत काम असल्यामुळें बंदरावर येणें झालें नव्हतें. आह्मांला नेण्यासाठीं रामभाऊ कारकुनाला पाठविण्यांत आलें होतें.

गिरगांवांत ट्रॅम टरमिनसशेजारीं शंभर रुपये दरमहाचा एक बंगला भाड्यानें घेतला होता. बिऱ्हाडीं जाऊन पोहोंचतांच पाहतें, तों दिवाणखान्यांत सुरेख वार्निस केलेल्या पांचपंचवीस खुर्च्या, कांहीं आरामखुर्च्या, दोनतीन कोच, एक मोठें वाटोळें टेबल, दोन दुसरीं टेबलें, दोनतीन कपाटें, भिंतीवर टांगलेल्या सुंदर सुंदर तसबिरी, टांगावयाचे, टेबलावर ठेवावयाचे राकेलचे दिवे, वगैरे थाट दृष्टीस पडतांच आजीबाई व मी चकित झालों. संध्याकाळीं पांच वाजण्याचे सुमारास गाडींत बसून येणें झालें. येतांच आजीबाईंनां भेटून त्यांच्याशीं बराच वेळपावेतों हास्यमुखानें घरगुती गोष्टींसंबंधीं बोलणें झालें. मी दाराआड उभी राहून चोरदृष्टीनें तिकडची आनंदी मुद्रा पहात होतें. इतक्यांत दिवे लागले. कुळें येऊं लागलीं. त्यांच्याशीं दिवाणखान्यांत बसून खटल्यांची समजूत घेण्याचें काम चालू झालें. जेवायास उठण्याविषयीं चारचारदा निरोप येऊं लागले, तरी उठण्यास फुरसत मिळेना ! अखेरीस नऊ वाजतां एकदांचें पाटावर येऊन बसणें झालें.

मी तर, कोर्टांतून आल्या घटकेपासून तिकडील थाट पाहून अगदीं थक्क होऊन गेलें होतें. कारण, जें माणूस घरीं साधीं धोतरें, साधाच अंगरखा व तशाच प्रकारचा साधा रुमाल इत्यादि पोषाख करीत होतें, त्याच माणसाचा मुंबईंत आल्याबरोबर पहिल्या नंबराचीं तलम सुताचीं उंची नागपुरी रेशमी धोतरें, सुंदर बनातीचा

पारशी फ्याशनचा काळा कोट, नारिंगी रेशमी पगडी, माझें जाकी-टहि ज्यावरून ओवाळून टाकावें असा मलमलीचा सदरा व रेशमी वासकूट, खिशामध्यें टिक् टिक् करीत सोन्याचा छडा लोंबणारें नाजुक घड्याळ, वगैरे वगैरे थाट कांहीं विचारूंच नको ! मला कसेंसेंच वाटूं लागलें. मुंबईंत येण्याबरोबर असा हा जमीनअस्मा-नाचा फरक कसा पडला, याचाच मला मोठा अचंबा वाटला. मला मात्र ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला होता, आणि आपण इकडे— अशा प्रकारच्या विचारांत मी गढून गेलें आहें इतक्यांत जेवण आटोपून दिवाणखान्यांत येणें झालें. त्यासरशी मी आंत गेलें. लवकरच आमचेंहि जेवण उरकलें. नंतर आजीबाईंशीं पुनः गप्पा-गोष्टी होऊन साडेदहा होतांच आह्मी उभयतां मोठ्या आनंदानें शयनगृहांत गेलों.

प्रकरण पंधरावें.

## पुरी फजिती !

मामंजींची नोकरीची मुदत भरून गेल्यामुळें त्यांनां सरकारांतून पेन्शन मिळालें. तेव्हां घरीं एकटें राहण्यापेक्षां सर्वांनीं मिळून एकत्रच असणें बरें, असा विचार करून ते सर्व मंडळीसह मुंबईस येऊन राहिले. त्यांनां येऊन आठ दिवसहि झाले नाहींत तोंच "आजपर्यंत कुठं स्वयंपाकी होता ! आपल्याला स्वयंपाकी कशाला पाहिजे ? असली दिखाऊ श्रीमंती काय कामाची ? बायकांनां भलतेसलतेच ढंग सुचायचे !" असे आजीबाईंचे उद्गार ऐकूं येऊं लागले आणि लवकरच त्याप्रमाणें अम्मलबजावणीहि झाली. स्वयंपाक्याच्या हातीं नारळ दिला आणि मला स्वयंपाक करावयाला सांगितलें.

कर्मधर्मसंयोगानें सासूबाईहि याच दिवशीं बाहेर बसल्या. घरांत इनमीन तीन बायकामाणसें. मी, सासूबाई आणि आजीबाई. पैकीं सासूबाई बाहेर बसलेल्या. आजीबाई स्वयंपाकखोलींत पायहि टाकीत नसत. अर्थात्, स्वयंपाकाचें श्रीगणेशापासूनचें सर्व काम करण्याची पाळी मजवरच आली. एखाद्याला हिंवताप भरावा, त्याप्रमाणें त्या दिवशीं आजीबाईंनीं "मुली, आज तूं सैंपाक कर," असें सांगतांच माझी अवस्था झाली. पाय लटलट कांपूं लागले. कारण, साऱ्या जन्मांत आजपर्यंत मी कधींहि चुलीपाशीं गेलें नव्हतें कीं फुंकणी हातांत धरिली नव्हती. माहेरीं आई स्वयंपाक करीत असे व मोलकरीण अवांतर काम करी.

सासरीं आल्याला मला बरेच दिवस झाले होते खरे, परंतु आज दिवसपावेतों मीं कधीं विस्तव देखील पेटविला नव्हता. यामुळें आजच्या स्वयंपाकाचें भयंकर ओझें माझ्या डोकीवर एकाएकीं येऊन पडल्याबरोबर मी अतिशयच घाबरून गेलें, व आतां काय करावें अशी मला मोठी काळजी पडली. दुसरा कांहींएक उपाय नव्हता. भीतभीत स्वयंपाकघरांत गेलें एकदाची. छातींत दुखेपर्यंत फू फू करून आणि धुरानें डोळे सुजवून घेऊन कशीबशी चूलतर पेटविली. चूल पेटतांच तिजवर डाळीचें भांडें चढविलें; परंतु पुढें काय करावयाचें, तें कोणाला माहीत ? माझी घाबरगुंडी उडाली. भाजी कशी करावयाची, भाताला पाणी तांदुळांच्या निमपट कीं पावपट ठेवावयाचें, यांपैकीं मला कांहींएक माहीत नव्हतें. त्यामुळें छाती एकसारखी धडधडूं लागली. बाहेर सासूबाईला जाऊन विचारीन ह्मणावें, तर तसेंहि करण्याला धीर होईना. "एवढेंसुद्धां का तुला समजत नाहीं ?" असें त्या ह्मणतील व त्यांनां माझें अज्ञान कळून येईल, या भीतीनें मी अगदीं गडबडून गेलें. मन कावरेंबावरें झाल्यामुळें भांड्यांतून तांदूळच काढावे, ते बाजूस ठेवून घटकेंत भाजीच चिरीत बसावें, घटकेंत उभेंच रहावें, घटकेंत मोरीमध्यें हात धुवायासच जावें, इत्यादि नानाप्रकार मी करूं लागलें. विस्तव पेटवून तास दीड तास झाला होता, तथापि चुलीवर दुसरें भांडें चढेल तर शपथ ! आंघोळसुद्धां केली नव्हती. बराच वेळपावेतों मी स्वयंपाकखोलींतून बाहेर आलें नाहीं असें पाहून बाहेरून सासूबाईनीं विचारिलें "तूं अझून अंग धुतलें नाहींस का ?"

"होय धुतें आतां," असें कांपत कांपत उत्तर देऊन घाईघाईनें मी स्नानाच्या खोलींत गेलें. अंगावरील ओलें वस्त्र सोडून सोवळें

नेसून चुलीपाशीं येऊन पाहतें तर वैलामधून विस्तव व्यर्थ जात आहे आणि डाळींत पाण्याचा थेंबहि नाहीं ! ती कोरडी सडसडीत होऊन बसली होती. ताबडतोब बरेंचसें पाणी ओतून ती ढवळली. पण आमटीला मसाला किती घातला पाहिजे, मीठ किती लागणार, तें माहीत कोणाला ? पावशेर हळदीची पूड तर चार चिमुटभर मसाला आणि अर्ध चिमुट मीठ घालून आंबटी तयार केली. खोबरें, केव्हां घालतात तें समजेना. चिंच, फोडणीची तीच गत ! एवंच, आमटीबाईची सेवा माझ्या हातून योग्य रीतीनें घडली नसल्यामुळें ती अगदीं रुसून बसली. डाळ बुडाशीं जाऊन बसली आणि पाणी वर तरंगूं लागलें.

भाताची कथा सदर्हूप्रमाणेंच. एक शीत शिजून मऊ झालें तर दुसरें कच्चेंच ! भात आटोपल्यावर पोळ्या करावयास बसलें. पण पिठामध्यें मोहन घालावयाचें कीं नाहीं, कणीक कशी मळावयाची, वगैरेबद्दल मला कांहींएक माहीत नव्हतें. यामुळें मोहन घातल्याशिवायच पीठ भिजविलें व पोळया करूं लागलें. अर्थात् तें फळफळीत झाल्यामुळें त्यांत आणखी पाणी घातलें तों तें अगदीं बिरबिरीत झालें. कांहीं केल्या पोळ्या ह्मणून लाटतां येईनात. मी इकडे गडबडींत गुंतलें असतां तिकडे वैलावरील भाजीची जळून रक्षा झाली. एकंदर अन्नाची याप्रमाणें दुर्दशा उडून गेली. जेवणाची वेळ तर जवळ जवळ येऊं लागली व माझ्या छातींत धडकी भरूं लागली. मामंजी काय ह्मणतील, सासुबाई काय बोलतील, आजीबाई काय करतील, अशी भीति वाटून मी अगदीं गांगरून गेलें. छाती धडधडूं लागली. घामानें सर्वांग डवडवून गेलें. मोठमोठ्यानें श्वास टाकीत टाकीत एकदा उभयतांचीं पानें वाढलीं. भात, भाजी,

वरण वाढतांना माझें तोंड काळेंठिक्कर होऊन गेलें. फाटक्या गोदडी-सारख्या सडवडीत, व कुत्र्याच्या कानांसारख्या वांकड्यातिकड्या आणि अगदीं वातड झालेल्या त्या पोळ्या वाढतेवेळीं मला असें मरणप्राय दुःख झालें, व मीं असें हिरमुसलें तोंड केलें, कीं, आजन्मांत मला इतकें वाईट कधींहि वाटलें नव्हतें. मामंजी कांहींएक शब्द न बोलतां गुपचुप आपल्याला जें कांहीं रुचलें तें थोडथोडें खाऊन उठून गेले; पण दुसऱ्यांचें जेवण लवकर संपेना ! माझी थट्टा करण्याकरितां ह्मण किंवा मला अधिक ओशाळें करण्याकरितां ह्मणून ह्मण, अथवा दुसऱ्या कोणत्याहि उद्देशानें ह्मण, तिकडून आपलें पुनःपुनः "भातच पाहिजे, आजची भाजी तर मोठी छान झाली आहे, आणखी एक पोळी वाढ, आजचें कितीतरी सुरेख जेवण," असे उद्गार काढीत बराच वेळपावेतों मिटक्या मारीत जेवण चाललें होतें; परंतु मला तर एकदा कधीं उठून जातील असें झालें होतें. अखेरीस माझी कांहीएक संभावना न करितां तिकडून एकदाचें उठून जाणें झालें.

मामंजी कांहीं बोलले नाहींत. यजमानांची समजूत करणें माझ्या हातीं होतें. तेव्हां अर्धी मोहीम तर आटोपलीच ! परंतु अझून सासुबाई आणि आजीबाई जेवायच्या होत्या. त्यांची धाकधुक मनास डंवचत होती. त्याहि एकदाच्या जेवावयास आल्या व आतां काय घडतें देवाला ठाऊक या भीतीनें मी गर्भगळित झालें. पानावरील वातड आणि करपलेल्या पोळ्या आजीबाईच्या दांतांस लागेनात ह्मणून त्यांनीं त्या टाकून "आपल्याला भातच वाढ," असें मला सांगितलें. भाताची तपेली त्यांच्या पानाशीं नेली मात्र, आतां वाढणार, इतक्यांत स्वस्तिवचन ऐकूं आलें, कीं, "हा काय भात केला आहेस, कीं खीर ?"

वाटींतील आमटी पाहिल्याबरोबर तर त्यांनीं नाकच मुरडलें! अंगावर एकदम कांटा चढविल्यासारखें करून त्या ह्मणाल्या "हें कसब तूं कुठं बाई शिकलीस? आमटींत मीठ घातलं होतं कीं नाहीं! हें तेल वरतीसं कां तरंगतं आहे? भाजीची साफ रक्षा होई-पर्यंत तूं काय करीत होतीस? अगबाई, कितीतरी खारटढाण झाली आहे ही? मला वाटत होतं, कीं, तूं लिहिण्यावाचण्यांत जशी कुशल आहेस त्याप्रमाणेंच गृहकृत्यांतहि हुषार असशील. पण फुकट ग फुकट तुझं जिणं! एवढी तीन लेंकरांच्या आई एवढी वाढलीस, आतां कांहीं तूं लहान नाहींस, अझून तुला मेली भाजी आमटीहि करतां येऊं नये?"

सासूबाई ह्मणाल्या "तुला एवढासुद्धां का स्वयंपाक माहीत नव्हता? अगोदरच कां नाहीं बोललीस? आज जेवणार मंडळीला उपाशीं राहावं लागलंसं दिसतं. वेडी कुठली तुला सैंपाक येत नव्हता तर दुसऱ्या कुणाकडून तरी करवला असता. सगळ्या अन्नाची घाण करून टाकलीस!"

काय सांगूं कुसुम! याप्रमाणें माझी अगदीं पुरी फजिती झाली. मला 'दे माय धरणी ठाय' होऊन गेलें! संध्याकाळीं, अर्थातच आह्मांला या कामगिरीवरून बडतर्फ करण्यांत आलें. मामंजी तर साऱ्या दिवसांत एक अक्षर बोलले नाहींत. बाकीच्या मंडळींनेंहि नंतर कांहीं टीका केली नाहीं. तेव्हां मला वाटलें, कीं, सर्वजणें ही गोष्ट विसरूनच गेलीं असतील; परंतु माझा तो समज अगदीं चुकीचा ठरला. "सब सोया तब अल्ला जाग्या," ह्मणतात नाहीं, त्याप्रमाणें सगळ्यांच्या मनांतून ती गोष्ट गेली असतांहि, रात्रौ सर्वांचीं जेवणेंखाणें आटोपून निजावयास जाण्याच्या पूर्वीं सगळींजणें

दिवाणखान्यांत एकत्र जमल्या वेळीं मामंजींनीं आजीबाईकडे वळून पुढीलप्रमाणें बोलण्याचा उपक्रम केला:—

"ऐकलें आई, मला वाटत होतें, कीं, आमच्या सुशिक्षित सूनबाई सगळ्या गोष्टींत जशा चतुर आहेत, त्याप्रमाणें स्वयंपाक करण्यामध्येंहि असतील. पण हीतर स्वयंपाक बिघडवून टाकण्यामध्येंच मोठी चतुर दिसते! मोठीच आश्चर्याची गोष्ट ह्मणावयाची! एवढें लिहावाचायला शिकली, इंग्रजीहि उत्तम प्रकारें शिकली आणि यःकश्चित् भात शिजवायला शिकली नाहीं! हिचें ज्ञान एवढें विशाल असेल असें मला स्वप्नांतहि वाटलें नव्हतें. बरें झालें कीं, आपण सगळींजणें येथें आलों आहों. इला एकटीलाच जर पाठविली असती तर कोणजाणे नवऱ्याचे कसे हाल व उपासमार करती ते!"

"हाल कसले होणार? एकटी असती तर स्वयंपाकी ठेवती. इला कुठं त्याची मोठीशी पर्वा आहे? आजकाल जिकडे पहावं तिकडे असंच दिसून येतं. एकेक मार मडमांपेक्षांहि 'एसफेस' चांगलं बोलतात, पण चटणी कशी करायची हें माहीत असेल तर देवाचीच शपथ! बायकांला ज्या गोष्टी अवश्य आल्या पाहिजेत त्या राहतात बाजूलाच, आणि उठला सुटला तो पोरीला भलतंच शिकवूं लागतो! खऱ्याकडे कोणीहि लक्ष्य पुरवीत नाहीं. आजपर्यंत चालत आलेले सगळे जुने रीतिरिवाज एकदम बदलून गेले. पुढं काय गत होईल देव जाणे! हें सगळं इच्या शहाण्या आईला कळायला हवं होतं!"

आजीबाईचें आणि मामंजींचें, सगळ्यांच्या देखत चाललेलें हें माझ्याविषयींचें भाषण ऐकून मी जागच्याजागीं थिजून गेलें. मनाला अत्यंत वाईट वाटलें. मीं मनांत ह्मटलें "देवा, माझी आज अशी विटंबना होण्याला मला जिवंत कां ठेवलेंस? आई! तूं मला सगळ्या

गोष्टी शिकवून तरबेज करून फक्त हीच गोष्ट शिकविण्यामध्यें चूक कां केलीस ? तुझ्या त्या भयंकर चुकीमुळें मला आज मरणप्राय दुःख सोसावें लागून तुझ्या पवित्र नांवालाहि कलंक लागत आहेना ? मामंजी ! आपलें ह्मणणें अगदीं रास्त आहे. स्त्रीजातीला बाकी सर्व ज्ञानापेक्षां स्वयंपाकाचें ज्ञान प्रथम पाहिजे. इतर ज्ञानामध्यें कुशल असून स्वयंपाककलेंत अडाणी असलेल्या स्त्रियांनां धिक्कार असो ! हाय, हाय ! आज माझी काय ही फजिती ! मी इतकी मूर्ख कशी ? कसेंहि करून मी आतां स्वयंपाक करण्यास शिकणारच ! ”

इत्यादि विचारांचें माझ्या मनांत एकसारखें काहूर चाललें आहे इतक्यांत सासूबाई ह्मणाल्या “ उत्तम प्रकारें कशिदा काढण्याला आणि तारसुद्धां वाचण्याला शिकली, परंतु स्वयंपाक करण्याला कशी नाहीं शिकली, देव जाणे ! कांहीं चिंता नाहीं. आईनं शिकविलं नसलं तरी आतां इला मीच शिकवीन व आजपासून इच्याकडूनच सर्व स्वयंपाक करून घेईन. प्रथम थोडे दिवस किंचित् बिघडला तरी हरकत नाहीं. ”

माझी फजिती इतक्यावरच संपली नव्हती. रात्रीं आणखी काय काय ऐकावें लागेल त्याची भीति माझ्या अंतःकरणांत एक-सारखी उभी होती. हां हां ह्मणतां ती वेळहि आली. तोंडावर बोलून कोणाची तरी उघडउघड मानहानी न करितां, अपरोक्षरीतीनें चांगली कानउघाडणी करण्याची शैली तिकडेस उत्कृष्ट साधली असल्यामुळें, आतां कोणत्या गोष्टीचा उपक्रम होऊन आपल्याला शालजोडींतले देण्यांत येतात, हें समजून घेण्याकडे माझें एकसारखें लक्ष्य लागलें. मी जवळच एका खुर्चीवर बसलें. परंतु तिकडे तर एका आरामखुर्चीवर पडून कसल्याशा पुस्तकाचें वाचन चाललें होतें.

थोड्या वेळानें वर मान करून मजकडे पाहून ह्मणणें झालें "ओहो! आपण आलां का? मीं पाहिलेंच नाहीं! तिकडे कां बसलां? या, अशा जवळ या!" असें ह्मणून व माझा हात धरून जवळच्या कोचावर आपल्याजवळ मला बसवून घेतलें, आणि आपण वाचीत असलेलें पुस्तक माझ्या हातीं देऊन तें पुढें वाचण्याला मला सांगितलें. दोनतीन पानें वाचल्यावर " स्त्रीजातीचीं मुख्य कर्तव्यें. " हा विषय आला. हा विषय मी जसजसा पुढेंपुढें वाचूं लागलें, तसतसें मला अधिकाधिक वाईट वाटूं लागलें. मी फारच लज्जित झालें. सातआठ पानें वाचून झालीं व इतक्यांत घड्याळांत अकरांचा ठोका पडला. त्याबरोबर तिकडून सांगणें झालें "पाहिलेंस, स्वयंपाकाचें ज्ञान उत्तम प्रकारें असणें हेंच दरेक स्त्रीचें आद्यकर्तव्य आहे आणि त्या बाबतींत तूं किती पटाईत आहेस याचा अनुभव सकाळीं आलाच!"

तिकडचें हें किंचित् विषादपूर्ण भाषण ऐकतांच माझें अंतःकरण भरून येऊन डोळ्यांतहि पाणी आलें. मीं लज्जित होऊन मुख खालीं घालून ह्मटलें " खरेंच गडे! माझ्या सगळ्या शिकण्यावर आणि हुशारीवर आज पाणी पडलें. आजच्यासारखी ओशाळी मी कधीं झालें नव्हतें! माझ्या हातून ही मोठीच चूक घडली, पण मी ती आतां लवकरच दुरुस्त करीन."

त्यासरशी उठून, कपाटामधून एक पुस्तक काढून तें माझ्याकडे देऊन सांगणें झालें, कीं, " हें पुस्तक मन लावून वाच, ह्मणजे तुला उत्तम प्रकारें स्वयंपाक करतां येईल."

मी मोठ्या आनंदानें तें पुस्तक उघडून पाहिलें. तें पाकशास्त्र होतें. दुसऱ्या दिवसापासून मी दररोज स्वयंपाक करूं लागलें. एकसारखा त्याचाच निदिध्यास घेतला. चुकलेंमाकलेलें सासूबाई

दाखवूं लागल्या. पुस्तकाचा मोठा उपयोग होऊं लागला. कांहीं दिवस लोटल्यावर त्या कलेमध्यें मी इतकी प्रवीण झालें, कीं, घरांत स्वयंपाकांत पहिला नंबर मींच पटकाविला ! माझ्यासारखें स्वयंपाक करणारें कोणीहि नाहीं, अशी माझी एकसारखी वाखाणणी होऊं लागली व नेहमीं मीच स्वयंपाक करूं लागलें.

प्रकरण सोळावें.

## आनंदाचे दिवस.

वर्ष दोन वर्षें लोटल्यावर आजीबाईला मुंबईत करमेनासें झालें ह्मणून त्यांनीं मामंजींसह पुनः गांवीं जाण्याचा बेत केला. जातेवेळीं आजीबाईनीं मला पोटाशीं धरून ह्मटलें " मुली ! आतां सांभाळून वाग बरं ! आतां तुझ्यावरच हें घर सोंपवून आह्मी जातों. नवऱ्याच्या आणि स्वतःच्या प्रकृतीला जपत जा. हयगय करूं नको. उभयतां एकमेकांच्या विचारें वागा व सुखानं नांदा ह्मणजे झालं. "

" आपण बिलकूल काळजी करूं नका. आपणा सर्वांला संतोष होईल अशा रीतीनंच मी वागेन. " मीं खालीं मान करून नम्रपणानें उत्तर दिलें.

बोटीवर जाण्याकरितां सर्व मंडळी गाडींत बसली व इकडे मला कसेंसेंच वाटूं लागलें. डोळे भरून आले, कंठ सद्गदित झाला. रडें आवरून धरण्याचा मीं पुष्कळ प्रयत्न केला, परंतु डोळ्यांतील अश्रु बाहेर पडल्याविना राहिले नाहींत. तें पाहून सासूबाई गाडींतून खालीं उतरून माझ्या पाठीवरून हात फिरवित ह्मणाल्या " असं वेड्यासारखं काय करतेस ? आह्मी लवकरच परत येऊं बरं ! "

लवकरच गाडी निघून गेली. मंडळीला पोंचविण्याकरितां बंदरावर स्वतः जावयाचें झालें होतें. सुमारें दीडएक वाजतां पुनः घरीं येणें झालें. कोर्टांत काम होतें, परंतु तिकडे लक्ष्य लागेना. कसें लागेल ? आप्तस्नेह मोठा विलक्षण आहे. घरीं येतांच कपडे खुंटीवर उतरून ठेवून आरामखुर्चीवर हुश्श हुश्श करीत खिन्नमुद्रेनें

पडणें झालें. माणसांच्या एकसारख्या गजबजीमुळें व म्हातारीच्या रात्रंदिवस जागीमुळें आनंदमय झालेलें तें घर, यावेळीं कसें अगदीं शून्य भासूं लागलें. आनंदाची छाया एकदम नष्ट झाली. तिकडली सचिंत मुद्रा पाहून मीं म्हटलें "खरेंच, माणसांविना घराला शोभा नाहीं! कालच हें घर किती रमणीय दिसत होतें व आज हें कसें अगदीं खायला येत आहे! आजीबाईची गडबड तर भारीच असे. आज माझ्या मनाला मुळींच चैन नाहीं. जीव कसा एकसारखा खालींवर होत आहे."

"मलाहि पण आज तसेंच झालें आहे. पण त्याला काय उपाय! संसारमोहामुळें आज आपल्याला इतकें वाईट वाटत आहे, उद्यां याहून कमी वाटेल. परवां त्याहून कमी, अशा रीतीनें हळुहळू या गोष्टीचा विसर पडल्याविना राहणार नाहीं!"

आणि खरोखर घडलेंहि पण तसेंच. कांहीं दिवस लोटल्यावर पुनः घरांत जिकडेतिकडे आनंद वास करूं लागला.

मी दररोज मोठ्या सकाळीं उठून प्रातर्विधि आटोपून ईशस्मरण करीत असें. गडी ठेविला होता, त्याच्याकडून घरांतील सर्व झाड-लोट करवून घेई. त्याचप्रमाणें गड्याकडून बाजारांतून भाजी वगैरे जिन्नस आणवून भांडींकुंडींहि घांसून घेई. आज्ञेप्रमाणें गड्यानें काम केलें आहे कीं नाहीं हें नीट तपासून आणि न केल्यास अथवा बरोबर न झाल्यास त्याच्याकडून तें पुनः करवून घेई व नंतर स्नान करण्यास जात असें. अंग धुऊन येऊन सोंवळें नेसून स्वयंपाकास लागणारें सर्व सामान हातापाशीं घेई. हळद नाहीं, तिखटच पाहिजे, असें मागाहून न व्हावें व वारंवार उठण्याचा प्रसंग न यावा, म्हणून सर्व तयारी करून मग स्वयंपाकास सुरुवात करीं. नऊ साडे

नऊ होण्यापूर्वीं स्वयंपाकाची सर्व तयारी करून स्नानाच्या खोलींत धुतलेला पंचा टुवाल स्वतः नेऊन ठेवीं व बंबांतील ऊन पाण्यानें घंगाळ भरण्याबद्दल गड्यास सांगून तिकडेस स्नानास उठण्याची वर्दी पोंचवीं. तिकडलें स्नानसंध्या वगैरे आटोपेपर्यंत इकडे माझें ताट वाढून तयार होत असे. जेवतेवेळीं आनंदाच्या आणि विनोद-पर गोष्टी बोलून मी तिकडलें मन रंजवीं. भोजन आटोपतांच हात धुऊन पानाचा विडा तयार करून देईं. तो घेऊन तिकडे धोतर नेसणें होई व नंतर मग मी जेवावयास बसें. याप्रमाणें तिकडची सेवा मी सकाळ संध्याकाळ स्वहस्तें करीत असें व पतीची सेवा हाच आपला परमानंद व हाच आपला भाग्योदय, असें मनामध्यें समजत असें.

कोर्टांत निघून गेल्यावर मी इकडे जेऊनखाऊन मोकळी होईं. नंतर कसलें तरी एखादें पुस्तक वाचीत किंवा कशिदा वगैरे काढीत अथवा डाळतांदुळ निवडीत सायंकाळपर्यंत वेळ काढीं. संध्याकाळीं बरोबर सहा वाजतां घरीं येणें होत असे व घरीं पाय पडतांच माझें अंतःकरण प्रफुल्लित होऊन आनंदसिंधूस भरतें येई! कोणी कुळें वगैरे भेटण्यास आलीं तर त्यांच्याशीं कामकाजा-संबंधानें बोलण्यास बाहेर दिवाणखान्यांत बसणें होई व मी इकडे स्वयंपाकाच्या तयारीस लागें. सात साडे सातांच्या आंत सकाळच्या-प्रमाणेंच भोजन होत असे. आठ साडे आठांच्या आंत माझेंहि जेवण होई व नंतर उरलेलें अन्न आणि भांडींकुंडी गड्याच्या हवालीं करून मी दिवाणखान्यांत येत असें. या वेळीं कुळांनां किंवा दुसऱ्या कोणालाहि भेट न देण्याचा नियम ठरविला असल्या मुळें नऊ वाजल्यावर आमच्या घरीं कोणीहि येत नसे. आह्मी

उभयतां या वेळीं नेहमीं एकांतांत असूं. कसलें तरी उपयुक्त पुस्तक वाचण्यांत किंवा धर्मसंबंधी, संसारसंबंधी अथवा ज्ञानसंबंधी विषयांवर वादविवाद करण्यांत बरीच रात्र घालविल्यावर नंतर प्रसन्नमनानें शयन करूं.

रविवारचें कोर्ट बंद असल्यामुळें या दिवशीं आह्मी संध्याकाळच्या वेळीं गाडी जोडून फिरावयास जात असूं. याप्रमाणें आमचे बरेच दिवस आनंदांत गेले.

प्रकरण सतरावें.

## पोर आली नि म्हातारी गेली !

आनंदाचे दिवस किती लवकर पळत असतात, याचा अनुभव प्रत्येकाला आहेच. त्याप्रमाणें वर्ष सहा महिने केव्हांच संपून गेले. हळुहळू माझ्या प्रकृतींत फरक दिसूं लागला. अंग पुष्ट होऊन शरीराची कांतीहि बदलली. अवयव विकास पावूं लागले व मुख प्रफुल्लित दिसूं लागलें. रोज रोज नव्यानव्या वस्त्रांभूषणांनीं नटण्या-मुरडण्याची अनावर वांछा मनाला होऊं लागली. त्याचप्रमाणें कित्येक पक्वान्नांवरहि माझी इच्छा जाऊं लागली. याप्रमाणें गर्भाचीं स्पष्ट चिन्हें दृष्टीस पडतांच माझे डोहाळे पूर्ण करण्याची तिकडून पुष्कळ काळजी घेण्यांत येऊं लागली. माझ्या शुश्रूषेकरितां मुद्दाम एक सुस्वभावी स्त्री स्वयंपाकीण ठेविली. कारकुनानें पत्र लिहून ही हकीगत घरींहि कळविली व त्यामुळें सर्वांनां फार आनंद झाला.

दिवसांमागून दिवस नि महिन्यांमागून महिने भरभर जात चालले. पांचव्या महिन्यास मला गांवीं नेलें. तेथें माझे पुष्कळ सोहळे करण्यांत आले. घरून, माहेरहून व इतर नातेवाईक मंडळी-कडून डोहाळेजेवण वगैरे सोहळ्यांचा एकसारखा वर्षाव झाला. अशा रीतीनें पूर्ण आनंदामध्यें नवमास भरल्यावर योग्य समयीं मी प्रसूत होऊन परम सुंदर आणि मनमोहक अशा एका गोजिरवाण्या कन्येची आई झालें. हाय हाय ! ते दिवस गेले ! कुठें तें माझें लाडकें बाळ ! कुठें माझे प्रिय जिवलग ! नि कुठें ही हतभागिनी ! पूर्व गोष्टींच्या स्मरणानें व्याकुळ होऊन संन्यासिनी एकदम मूर्च्छित झाली.

इंदिरा आणि कुसुम, संन्यासिनीची अशी स्थिति पहातांच गर्भगळित झाल्या. त्यांनीं लगबगीनें तिच्या तोंडावर पाणी शिंपडून व इतर उपाय करून मोठ्या कष्टानें तिला सावध केलें. संन्यासिनी शुद्धींत आल्यावर कुसुमकुमारी भीतभीत म्हणाली " माई ! आपल्या लाडक्या कन्येचं आणि यजमानांचं या वेळीं आपल्याला स्मरण कां बरं झालं ? ईश्वर त्यांना सुरक्षित ठेवो ! आपलं एकंदर चरित्र ऐकतांना मनाला मोठा आनंद वाटला; परंतु या शेवटच्या एकदोन वाक्यांनीं अंतःकरण कसं दुभंग होत आहे ! आपल्या प्रिय पतीचं आणि कन्येचं पुढं काय घडलं तें जाणण्याविषयीं मन कसं एकसारखं तळमळत आहे. "

संन्यासिनी स्वस्थचित्त झाल्यावर म्हणाली " भिऊं नका मुलींनों ! मला वायूचा विकार असल्यामुळें अकस्मात् कधींकधीं असें घडत असतें. तुम्ही घाबरूं नका ! "

नंतर ती सांगूं लागली, न्हाऊनमाखून मोकळी झाल्यावर बाराव्या दिवशीं मोठ्या समारंभानें मुलीचें नांव मंजुळा असें ठेविलें. मुलीला सहा महिने झाल्यावर मी पुनः मुंबईस आलें. बरोबर सासूबाईहि आल्या होत्या. पोर हळुहळू रांगूं लागली. तिचे ते बोबडे बोल, मनोहर मुख आणि बाललीला पाहून आम्हां सर्वांचीं अंतःकरणें प्रेमरसानें भरून जात. या वेळीं माझें वय सुमारें अठरा वीस वर्षांचें होतें.

उन्हाळ्याची रजा पडून कोर्ट बंद झाल्याकारणानें सर्व वकील, बॅरिस्टर महाबळेश्वर, माथेरान वगैरे हवेच्या ठिकाणीं गेले व आम्ही गांवीं निघून आलों. गांवीं येण्याचें कारण, आजीबाई अत्यावस्थ असल्यामुळें ताबडतोब निघून येण्याविषयीं मामंजींचें पत्र

आलें होते. त्यामुळें रजा पडल्याच्या दुसऱ्याच दिवशीं आह्मी घरीं आलों. ह्मातारी या वेळीं अगदीं पंथास लागली होती. तिनें फक्त आह्मांला ओळखलेंच कायतें; परंतु एक शब्दहि बोलण्यापुरती शक्ति किंवा शुद्धि तिला या वेळीं राहिली नव्हती. दुसऱ्या दिवशीं पहांटे चार वाजतां तिनें देह ठेविला. घरांतली मंडळी रडूं लागली. वास्तविक पाहूं गेलें असतां ह्मातारीचें कांहीं वाईट झालें नव्हतें. ती मोठी पुण्यवानच ह्मणावयाची. आपल्या मागें बराच परिवार आणि संपत्ति ठेवून व नातवंडांपणतवंडांचें सुख आणि ऐश्वर्य भोगून तिनें आपल्या वयाच्या ऐशींव्या वर्षीं संसारयात्रा पुरी केली होती. असें भाग्य थोड्यांच्याच दैवीं असतें. कांहीं काळपावेतों तिच्याबद्दल आह्मां सर्वांनां जरी फार दुःख झालें तरी लवकरच त्याचा विसर पडला.

मंजुळा हळुहळू वाढूं लागली. चवथें संपून आतां तिला पांचवें वर्ष लागलें. बाळपणापासूनच तिच्या शिक्षणासंबंधीं मी फार काळजी घेऊं लागल्यामुळें ती फार हुशार आणि सद्गुणी निपजली व घरांतील लहानथोर मंडळीस तिनें आपल्या बालचेष्टांनीं अगदीं वेड लावून सोडलें. अहाहा! त्या सुखाची सर दुसऱ्या कशालातरी येईल काय? आमचे ते दिवस खरोखर अत्यंत मोठ्या आनंदांत गेले.

## प्रकरण अठरावें.

## पडता काळ.

या जगांत सर्वांच्या दैवीं नेहमीं सुखच असतें, तर मग लोक स्वर्गाची तरी इच्छा कां करते ? सुख आणि दुःख यांचें चक्र दुनियेंत सारखें फिरत आहे. आज कोणाची चढती आहे तर कोणाची पडती आहे; कोणी यथेच्छ सुखविलासांत मग्न आहे तर कोणी दुर्धर दुःखयातना भोगीत आहे ! एवंच, सुख आणि दुःख ह्यांचें हें रहाटगाडगें एकसारखें फिरतच आहे. आज जो आपल्याला आनंदगिरीच्या उच्च शिखरावर बसलेला दिसतो, तो दुःखदरीमध्यें केव्हां गडगडून पडेल याचा कांहींच नेम सांगतां येणार नाहीं. सुखामागून दुःख हें ठेवलेलें असावयाचेंच. त्या सृष्टिनियमाला आम्हीच अपवादात्मक कशीं बरें होऊं ? आमचे सुखाचे दिवस बदलून आतां दुःखाच्या दिवसांनां आरंभ झाला. अरेरे ! आमची अशी विपन्न दशा होईल अशी कोणीं स्वप्नांतहि कल्पना केली नसेल !

एक दिवस संध्याकाळीं आफिसांतून उदास मुद्रेनें येऊन कांहींएक न बोलतां अगदीं म्लान मुख करून बसणें झालें. घरीं येतांच हास्यमुखानें माझ्याशीं विनोदपर भाषण करण्याचा नेहमींचा संप्रदाय असतां, आज अशी खिन्न मुद्रा पाहतांक्षणीं माझ्या छातींत धस्स झालें. हातचें काम तसेंच अर्ध्यावर टाकून मी लगबगीनें बाहेर येऊन घाबरेपणीं विचारिलें " आज असें तोंड उतरलेलें कां दिसत आहे ? एवढ्या कसल्या काळजींत पडायचें, तें कळवायचें नाहीं का ? "

" कांहीं नाहीं ग, उगाच ! " असें उदासवाणीनें तिकडून उत्तर मिळालें; परंतु त्यानें माझें मुळींच समाधान झालें नाहीं. माझी स्थिति त्या वेळीं कशी झाली होती तें माझ्या मनालाच ठाऊक ! मीं दीनवाणीनें ह्मटलें " नाहीं कसें ह्मणतां गडे ! आपल्या सुखदुःखाची वांटेकरीण असलेल्या या दासीला जर आपण आपलं मनांतील दुःख सांगणार नाहीं, तर दुसऱ्या कुणाला बरं सांगणार ? "

माझे हे कळवळ्याचे शब्द ऐकून गळा दाटून येऊन दुःखी मुद्रेनें ह्मणायचें झालें " लाडके ! काय सांगूं तुला ? ओरीयंटल ब्यांकेनें दिवाळें काढल्यामुळें आपली सर्व—" असें बोलून दुःखानें कपाळावर हात मारून घेणें झालें.

ही दुर्वार्ता ऐकतांच माझेहि एकदम पाय खचले. तथापि तिकडेस धीर देऊन मीं ह्मटलें " ईश्वराची इच्छा ! त्याच्या मनांत नाहीं आह्मांला सुखी ठेवायचं असलं तर तेथें आपला कांहीं इलाज का आहे ? तो ठेवील तसं राहिलं पाहिजे. आपले हातपाय सुरक्षित असले ह्मणजे झालं. मेला पैसा पैसा तो काय ! पुनः मिळवितां येईल ! गेला तो पैसा आपला नव्हताच असं समजून मनाचं कसं तरी सांत्वन केलं पाहिजे. सोन्यासारख्या जीवाचीहि जेथें शाश्वती नाहीं, तेथें मेल्या पैशाची ती एवढी मातब्बरी कसली ? बरोबर कोणीं पैसा नेला आहे ? नि जास्त पैसा असला ह्मणजेच सुख मिळतं असं कांहीं नाहीं. त्याबद्दल एवढा शोक कशाला ? रात्र बरीच झाली आहे, उठायचं आतां जेवायला. "

इत्यादि समाधानाच्या गोष्टी सांगून तिकडेस जेवायास उठविलें, परंतु तिकडच्या मनाला जो धक्का बसला होता तो साधारण नव्हता.

अगोदरच अंगाची काठी कृश आणि त्यांत हा असा आकस्मिक चिंतेचा जबरदस्त धक्का बसल्याबरोबर त्याचा देहावर आणि मनावर फारच भयंकर परिणाम झाला. दोनच दिवसांच्या आंत, जसा एखादा पुष्कळ दिवसांचा दुखणेकरी असतो तशी दशा झाली. कोर्टांत जाणेंयेणें होई, तथापि मनामध्यें सारा दिवस आपली एकसारखी काळजी आणि चिंता ! मी आपली शिकस्त करून गत गोष्टीचा विसर पाडण्याचें करीं, परंतु घराबाहेर पडतांक्षणीं पूर्वस्थिति होत असे.

एक दिवस दुपारचे दोन वाजले होते. एकाएकीं घरीं येणें झालें. दोन वाजतांच गाडी परत आलेली पहातांच मी चकित होऊन बाहेर ग्यालरींत आलें व पहातें तों तिकडील तब्यत एकाएकीं बिघडल्याचें दिसून आलें. बरोबर कारकून आणि डाक्तर आला होता. दोघांनीं दोन्ही हातांस धरून हळुहळू माडीवर आणून पलंगावर निजविलें. इंग्रजीमध्यें डाक्तराशीं चाललेल्या भाषणावरून तिकडेस अर्धांगवायूचीं लक्षणें झालीं असल्याचें मला कळून आलें. तें ऐकून तर मला दे माय धरणी ठाय असें झालें. डाक्तर जातांच मी जवळ जाऊन अंगावरून हात फिरवीत काय होत होतें तें विचारूं लागलें. बोलतांना तिकडील जीभ अडूं लागली. बोलतांबोलतां एकदम आपली जीभ आडवी पडली, असें झटलें. मी एकसारखी रडूं लागलें. तिकडेहि डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहूं लागले. बिचारा कारकूनहि सुकून गेला. डाक्तरानें सांगितल्याप्रमाणें मीं मोठ्या आस्थेनें पथ्यापाण्याची व्यवस्था केली. दुसरे दिवशीं पुनः डाक्तर आला. त्यानें एकंदर प्रकृति तपासून पाहिली व सांगितलें "काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. व्याधि बरी होईल, परंतु थोडा विलंब

लागेल. मात्र हा वकिलीचा धंदा सोडून देऊन कांहीं दिवस स्वस्थ विश्रांति घेतली पाहिजे."

मीं ही सर्व हकीगत पत्र पाठवून तावडतोब घरीं कळविली. पत्र पोहोंचतांच घरची सर्व मंडळी लगबगीनें मुंबईस आली. औषधपाण्याकडे पाण्यासारखा पैसा खर्च केल्यामुळें दुखणें पुढें ह्मणण्यासारखें वाढलें नाहीं खरें, तथापि बोलतेवेळीं जीभ अडूं लागली. या सगळ्याचें कारण मानसिक रोग हेंच होतें. त्या गोष्टीचा एकसारखा ध्यास घेतल्यामुळें शरीरांतील शक्तीहि क्षीण होऊन हिरासारखी दशा झाली. वारंवार मागील स्थिति आठवून तिकडे दुःखाचा उमाळा येई व कंठ दाटून माझ्या मांडीवर मस्तक ठेवून शोक करणें होई. "लाडके ! आपण निर्धन झाले आणि त्यांत दुःखावर आणखी डागणी देण्याकरितां ईश्वरानें ही व्याधि पाठवून दिली. मी बरा असतों तर हर प्रयत्नानें पुनः पैसा मिळविला असता. आतां आपली पुढें काय गत होईल ?" असे दुःखोद्गार काढीत एकसारख्या अश्रु-धारा सोडण्यांत येत. तें पाहिल्यावर माझ्या अंतःकरणाचें पाणीच होई. हाय हाय, ते दिवस दुष्टासहि न येवोत !

तिकडली ती दीनवाणी मुद्रा पाहून मी नाना प्रकारें समाधान करीं. "एवढा मोठा सार्वभौम नलराजा त्याची काय अवस्था झाली ? रामाला चौदा वर्षे दुःसह अरण्यवास कंठावा लागला. पांडवांचे हालहाल झाले. आपण तर यःकश्चित् मनुष्य. मोठमोठ्या देवादि-कांच्या दैवींचींहि संकटं टळलीं नाहींत, मग आपला पाड काय ? धीर धरून आलेले दिवस कंठिले पाहिजेत. त्या परमेश्वरासच करुणा येऊन तोच पुन्हा चांगले दिवस दाखवील." इत्यादि नाना प्रकारें धीर देऊन कसेंतरी तिकडचें सांत्वन करीत असें.

हळुहळू वर्ष सहा महिने होत आले. क्रमाक्रमानें दुःखाचा विसर पडत चालला व प्रकृति सुधारून थोडीशी शक्तीहि वाटूं लागली. प्रकृति बरीच सुधारल्यावर पुन्हा कोर्टांत जाण्यायेण्यास सुरुवात केली; परंतु पदोपदीं जीभ अडूं लागल्यामुळें बोलण्याच्या कामांत हरकत होऊं लागली. ह्मणून वकिलीचें काम सोडून देऊन कोठेंतरी नोकरी पहावी, असा विचार ठरला. कर्मधर्मसंयोगानें जंजिरा संस्थानांत सर न्यायाधीशाच्या जागीं दिवाणाकडून बोलावणें आलें. तिकडील हवापाणी प्रकृतीस अनुकूल असल्याबद्दल डाक्तराची सल्ला मिळतांच ती जागा पत्करणें झालें. लवकरच आह्मी जंजिऱ्यास निघून गेलों.

## प्रकरण एकोणिसावें.

# मुलगी गमावली !

जंजिरा संस्थानांत वर्ष दोन वर्षे घालविल्यावर माझ्या बाळंतपणाचा समय अगदींच जवळ येऊन ठेपल्यामुळें मी माहेरीं गेलें. पूर्ण नवमास भरतांच मला एका पुत्ररत्नाचा लाभ झाला. हें आनंदाचें वर्तमान ऐकून सर्व मंडळीस मोठा संतोष झाला. बाराव्या दिवशीं मोठ्या सोहळ्यानें मुलाचें नांव मधुकर असें ठेविलें. हां हां ह्मणतां सहा महिने केव्हांच निघून गेले. माझें मन पुनः जंजि-ऱ्याला जाण्याविषयीं एकसारखें खालींवर होऊं लागलें. आठपंधरा दिवसांच्या आंत तिकडे निघून जाण्याचा मीं निश्चय केला होता. परंतु इतक्यांत मध्येंच एक नवीनच विघ्न उभें राहिलें. मंजुळा एकाएकीं तापानें आजारी पडली व तिच्या अंगावर देवी दिसूं लागल्या. हळुहळू ताप फारच विकोपास जाऊन सर्वांग देवीच्या फोड्यांनीं भरून गेलें. तीळ ठेवीन ह्मटलें तर रिकामी जागा दिसेनाशी झाली. तिच्याकडे पाहिल्याबरोबर पोटांत भडभडून येई.

कोणी ह्मणे "देवी कोपली आहे, तिची पूजा केली पाहिजे. ब्राह्मणसुवासिनींला भोजन घाला." कोणी ह्मणे "वारें पडतां कामा नये." कोणी ह्मणे "पाणी घाला." कोणी सांगे "औषधबिवषध कांहीं देऊं नका हो ! देवी कोपेल." असें कोणी कांहीं, कोणी कांहीं, मनास येईल तसें बोलबोलून आह्मां सर्वांनां भंडावून सोडलें ! परंतु या त्यांच्या ह्मणण्याकडे मीं मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. लहान-पणींच मुलीला देवी टोंचून घेतल्या नाहींत त्यामुळेंच आज

अशी स्थिति झाली आहे; मंजुळेला जर देवी टोंचविण्यांत आल्या असत्या तर तिचे आज असे हाल झाले नसते, हा विचार मला अगदीं असह्य झाला. आपल्या लेंकरांला, तीं वर्षे सहा महिन्यांचीं होण्यापूर्वींच जीं आईबापें देवी टोंचवीत नाहींत, तीं त्या बापड्या लेंकरांचीं हितकर्तीं नसून खरोखर वैरीच समजलीं पाहिजेत ! आईबापांची या बाबतींत अनास्था व अज्ञान हेंच बहुतेक अंशीं बऱ्याच निरपराध अर्भकांच्या अपमृत्यूचें मुख्य कारण असतें. अशा मूढ आईबापांच्या माथीं अजाणपणें बालहत्येचें पातक बसत असतें. असो. " ही मुलगी उद्यां सकाळपावेतों याच स्थितींत असल्यास मी उद्यां औषध पाठवीन, " असें सांगून व आणखी बराच निषेध करून डाक्तर तडफडत निघून गेला. जातांजातां त्यानें बजावून सांगितलें, कीं, " झालें तें झालें, आतां या मुलाला —मधुकराला—तरी अझून देवी टोंचविल्या नसल्यास जरूर टोंचवा."

डाक्तरानें औषध दिलें नाहीं हें पाहून माझें व आईचें काळीज उडून गेलें ! घरांतल्या सर्व मंडळीनें ती सारी रात्र मंजुळेजवळ बसून काढली. बिचारी सारखी तळमळत होती. दुःखाच्या वेदनांनीं तिचें मुख म्लान झालें होतें व कण्हण्याची शक्तीहि तिच्यांत राहिली नव्हती. बाबा या दिवशीं कुठेंसे बाहेर गांवीं गेले होते. घरांत सर्व पोरवडाच होता. जें कोणी समाचाराला ह्मणून येई तें "वारें पडूं देऊं नका हो बाई ! पोरीला उघडी कां निजविली आहे? पडदा ओढा. तुपाचा दिवा लावा. पंचवीस सुवासिनी पुजीन असा देवीला अगोदर नवस करा. " वगैरे वगैरे बोलून आह्मां सर्वांनां भिववून सोडूं लागलें. धीराचे दोन शब्द कोणाच्याहि तोंडून ऐकूं येईनात ! आजारी नसलेल्या माणसालाहि बळेंच

आजारी पाडण्याच्या या अडाणी बायांच्या मूर्खपणाच्या रीतीचा, आणि भलभलत्या संशयी व अंध विश्वासाच्या गोष्टींचा, मला अगदीं वीट आला.

पहांटेस सुमारें चारांचा अम्मल झाला होता. माझ्या बाळाच्या प्रकृतींत एकाएकीं विलक्षण फरक दिसूं लागला. तिची मुद्राहि निराळीच भासूं लागली. मंजुळा आह्मांकडे एकसारखी वारंवार टक लावून पाहत असे. पण तिनें आतां आपले दोन्ही डोळे घट्ट मिटून घेतले होते. फटफटीत उजाडतांच तिची चर्या भयंकर दिसूं लागली. घशांत पाणीहि उतरेनासें झालें. श्वासोच्छ्वास जोरानें चालू झाला.

हाय रे दैवा! माझ्या सुकुमार बाळाचे असे हाल प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहते वेळीं या अभागिनीच्या अंतःकरणाची अवस्था कशी झाली होती ती त्या एका परमेश्वरालाच ठाऊक! हृदय भरून येऊन दुःखाचे हुंदक्यांवर हुंदके येत होते. डोळ्यांतून सारखा अश्रूंचा पूर वाहत होता. इतक्यांत आईनें एकदम हंबरडा फोडतांच मीं तर आकांतच मांडला. हाय हाय! नकोरे देवा, तसा प्रसंग वैऱ्यावरहि नको! बाळ मंजू! आतां तूं कुठेंग असशील? हा-य हा-य! ही चांडाळीण अझून कशाला जीवंत राहिली आहे?

संन्यासिनी एकसारखी आक्रोश करूं लागली.

बराच वेळ हृदयद्रावक आक्रोश केल्यामुळें दुःखावेग थोडासा कमी झाल्यावर संन्यासिनी पुनः बोलूं लागली. ती ह्मणाली, माझी ही स्थिति पाहतांच शेजारपाजारची बरीच मंडळी धावून आली व मला पोटाशीं घेऊन नानाप्रकारच्या सांत्वनाच्या गोष्टी सांगूं लागली.

मरण हें सर्वांनां आहेच. सर्व कोणी, उशिरां लौकर, मरण्याकरितांच निर्माण झालें आहे. ईश्वरानें प्राणिमात्राच्या मागें हें मृत्यूचें सूत्र लावून दिलें नसतें तर हा सृष्टीचा एकंदर व्यवहारच चालला नसता. इत्यादि गोष्टी ह्मणजे मला कळत नव्हत्या, असें नाहीं. परंतु चारपांच वर्षांचें लाडकें, गुणी आणि मनोहर बाळक, असा अचानक, आकस्मिक दगा देऊन निघून गेल्यावर माझें मन कसें बरें दुभंग झाल्याविना राहील ? अरेरे ! माझ्या सोनुल्याला मीं चांडाळणीनें देवी टोंचविण्याची कां हयगय केली ? या भयंकर चुकीमुळें मी माझ्या लाडक्या मनोहर बाळाला आज अंतरलें ना ? आतां मी तिकडे काय सांगूं ? मंजुळेला तिकडेच कां ठेवून आलीस असें विचारणें झाल्यावर काय उत्तर देऊं ? तिकडे कोणच्या तोंडानें जाऊं ? तिकडे ही हकीगत ऐकून काय वाटेल ? इत्यादि दुःखजनक विचारांत मी चूर झालें.

रात्रीं मला भयानक स्वप्नें पडूं लागलीं. मंजुळा वारंवार ' आई आई ' ह्मणून हांका मारीत आहे, असा मला भास होऊं लागला व वारंवार डोळ्यांपुढें तिची ती गोजिरवाणी मूर्ति दिसूं लागली. कोणी अडाणी माणूस असतें तर त्याला वाटलें असतें, कीं, हे सारे भुताचेच खेळ आहेत. मंजुळा भूत होऊन आली आहे, असा मनाचा समज करून घेऊन त्यानें आपल्या स्वतःला हैराण करून घेतलें असतें व बरोबर घरच्या मंडळीसहि हैराण केलें असतें. परंतु मला पक्कें माहीत होतें, कीं, भूतापिशाच्च वगैरे कांहींएक नाहीं. प्रेमाचा भ्रम हाच भूताचा भास आहे.

असो. सुखाचे दिवस ज्याप्रमाणें हळुहळू निघून जातात, त्याप्रमाणें दुःखाच्या दिवसांचीहि गत आहे. महिना दोन महिने लोटले,

हळुहळू दुःखाचा विसर पडत चालला, व पुनः पूर्ववत् संसाराचें रहाटगाडगें सुरू झालें. परंतु मंजुळेच्या मृत्यूपासून मला एक उत्तम धडा मिळून चुकला. मधुकर आठ महिन्यांचा होण्यापूर्वींच मीं त्याला डाक्तराकडून देवी टोंचवून घेतल्या. नंतर लवकरच मी जंजिऱ्यास निघून गेलें.

जंजिऱ्यास गेल्यावर माझ्या शोकानें पुनः उचल खाल्ली. तिकडेहि अतिशयित दुःख झालें. आठपंधरा दिवस जाईपर्यंत तिकडून मला याबद्दल कांहीं दोष देणें झालें नव्हतें; परंतु पुढें एक वेळ सहज बोलतां बोलतां म्हटलें, कीं, " आईचीं खरीं कर्तव्यें काय आहेत हें जर तूं समजून घेतलें असतेंस व त्याचा पूर्णपणें अभ्यास केला असतास, तर मुलीला अशी घालविली नसतीस ! ज्या आईला आपलीं कर्तव्यें बरोबर ठाऊक नाहींत त्या आईचीं बालकें अभागी होत ! "

## प्रकरण विसावें.

## सुसंगाचें फळ.

जंजिरा येथें आमचें घर मध्यवस्तींत होतें. आमच्या घराशेजारींच सदाशिवराव नांवाचे एक गृहस्थ राहत असत व त्यांच्या घराला लागूनच माधवराव देशमुख नांवाच्या एका सुशील गृहस्थाचें बिऱ्हाड असे. सदाशिवरावांच्या कुटुंबाचें नांव राधाबाई असें होतें. सदाशिवरावांनां इंग्रजी शाळेमध्यें २५ रुपये दरमहाची असिस्टंट मास्तराची नोकरी होती. परंतु राधाबाईचा कुर्रा कांहीं विलक्षण असे! त्या आपला दिवसांतील बहुतेक वेळ चट्टीपट्टी करण्याखालींच दवडीत. त्याचप्रमाणें ती मोठी अभिमानी आणि गर्विष्ठ बायको होती. चारचार बोलावणीं पाठविलीं तरीहि तिला कधीं घटकाभर फुरसत ह्मणून मिळत नसे. शिवाय, क्षुल्लक गोष्टी-वरूनहि ती एकदम चिडत असे. यामुळें तिचें माझें बरोबर पटत नसे. कारणपरत्वेंच आह्मां उभयतांची भेट किंवा भाषण होत असे. परंतु माधवरावांच्या पत्नी रमाबाई यांची आणि माझी दाट मैत्री जमली होती. माधवरावांला कारभाऱ्याच्या आफिसांत नोकरी असे.

रमाबाईनां वत्सला ह्मणून दोन वर्षांची एक गोजिरवाणी मुलगी होती. बेटा कुसुम! तुझें सुंदर मुख पहातांच मला त्या माझ्या मैत्रिणीच्या वत्सलेची राहून राहून आठवण होत असते. त्या चिमु-कल्या वत्सलेचें रूप, गुण अगदीं थेट तुझ्यासारखे होते. तुझ्या-सारखेंच ती मधुर आणि चित्ताकर्षक भाषण करीत असे. माझें वेडें मन मला पुनः पुनः सांगत असतें, कीं, तीच ही वत्सला! तीच ही

माझी आवडती वत्सला ! असें मनांत येऊन तुला उराशीं घट्ट धरावी, असें वाटतें. ईश्वरानें तुह्मां दोघांच्या स्वरूपांत कितीतरी चमत्कारिक साम्य ठेविलें आहे !

माधवराव आणि रमाबाई हें जोडपें प्रेमरसाची मूर्तिमंत प्रतिमा होती. उभयतांचें एकमेकांवर एवढें अकृत्रिम प्रेम होतें, कीं, तसें प्रेम अन्यत्र क्वचितच दृष्टीस पडेल. नवऱ्याच्या शरीराला जरा दुखलें, कीं, बायकोचें सर्वांग दुखूं लागे व त्याचप्रमाणें बायकोच्या केशास यत्किंचित् धक्का लागतांच नवऱ्याचा जीव कासावीस होई !

मी जंजिऱ्यास गेलें त्याच दिवशीं, जरी आह्मां परस्परांची पूर्वींची यत्किंचितहि ओळख नव्हती, व मी कोण, कुठली, माझें नांव गांव वगैरे त्यांनां कांहींच ठाऊक नव्हतें, तरीहि त्या मायाळू स्वभावाच्या रमाबाई " आपण इथें राहायला आलां याचा आपल्याला फार आनंद झाला. आपण आमच्या शेजारीं आलां हें फार चांगलें झालें," इत्यादि हास्यमुखानें मोठ्या प्रेमानें माझ्याशीं बोलल्या. दुसऱ्या दिवसापासून तर त्या दिवसामधून तीनचार वेळ येऊंजाऊं लागल्या. वत्सला तर सारा दिवस आमच्या घरींच खेळूं लागली. आठ दिवस लोटण्यापूर्वींच आह्मां उभयतांचा इतका दाट स्नेह जमला, कीं, त्याबद्दल आमचें आह्मांलाच आश्चर्य वाटूं लागलें ! सख्या बहिणीहि एखादे वेळीं संकोचवृत्तीनें वागतील, परंतु आह्मी दोघी परस्परांशीं इतक्या मोकळ्या मनानें वागूं लागलों, कीं, पाहणारांनां आमचा हेवाच वाटावा ! घरांतील कामकाज आटोपतांच आह्मी दोघीहि कसलेंना कसलेंतरी उपयुक्त पुस्तक घेऊन वाचीत बसूं, अथवा कशिदा वगैरे शिवण्याविणण्याचें काम करूं. मला ज्याप्रमाणें वाचनाची अत्यंत आवड असे, त्याचप्रमाणें, किंबहुना माझ्याहूनहि

कांकणभर जास्त, रमाबाई त्या विषयाच्या भोक्त्या असल्यामुळें आह्मां उभयतांची दाट मैत्री जमून उभयतांचा वेळ मोठ्या आनंदांत जाऊं लागला, यांत नवल तें काय ?

रमाबाईच्या यजमानांपाशीं पुष्कळ पुस्तकसंग्रह असे व त्याचप्रमाणें त्यांच्या येथें बरींच वर्तमानपत्रें आणि मासिक पुस्तकें येत असत. शिवाय, आमच्याकडेहि कित्येक वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें येत. तीं आह्मी दररोज मोठ्या उत्सुकतेनें आणि प्रेमानें वाचीत असूं. कधीं एखादी उपदेशपर मनोरंजक कादंबरी वाचावी; कधीं वैद्यकीय माहितीचें पुस्तक वाचावें; कधीं बोधप्रद असा एखादा सोपासा निबंध; कधीं एखादी मनोवेधक कविता; कधीं पाकशास्त्र; कधीं विणकामाचें, कणारांगोळीचें वगैरे पुस्तक इत्यादि इत्यादि आवडेल तें वाचून मनाची करमणूक करूं. रमाबाईचा कंठ फार मधुर असून त्या पुस्तकांतील कविता सुरावर गाऊं लागल्या ह्मणजे मी तहानभूक विसरून भुजंगासारखी तल्लिन होत असें. रमाबाई जशा सदा आनंदी आणि हंसतमुख होत्या, त्याप्रमाणेंच त्यांचे यजमानहि हौसी आणि उल्हासी असत. ईश्वरानें जोडा मोठा सुरेख निर्माण केला होता. सर्व गोष्टींत आणि सर्व बाबतींत नवराबायकोंचें विलक्षण साम्य असे.

रमाबाईनीं आपल्या मुलीला वीसपर्यंत अंक चुकल्याशिवाय मोजावयाला शिकविले होते व त्याचप्रमाणें कित्येक शब्दांचें ज्ञानहि तिला करून दिलें होतें. पोर मोठी गोजिरवाणी आणि मधुर बोलणारी होती. उच्चार अगदीं स्पष्ट व स्वच्छ करी. आणि यामुळें शेजारपाजारच्या साऱ्या मंडळीची ती एक करमणूकच होऊन बसली होती ! संध्याकाळीं माधवराव आणि मधुकराचे वडील

कचेरींतून घरीं येतांच, पहिल्या प्रथम वत्सलेला जवळ घेऊन ती आज नवीन काय काय शिकली त्याची झडती घेत. पोर मोठी चलाख व धीट असल्यामुळें, आपल्याला येत असलेल्याचा झट-दिशीं जबाब देऊन, सुचत नसलेलें "आह्माला नाहीं येत!" असें चोख उत्तर देऊन मोकळी होई. वत्सलेच्या या उत्तरावर " नाहीं कसें येत ? विसरलीस ? " असें ह्मणून दोघांपैकीं कोणींतरी एक-जणानें तिला सुचवावें, व सुचवूनहि तिला आलें नाहीं ह्मणजे मग पुनः तिला कौतुकानें समजावून द्यावें. याप्रमाणें तिचें शिकणेंच्या शिकणें होई व शिकविणारासहि ती एक प्रकारची करमणूक होई.

माझा मधुकर या वेळीं अगदीं लहान होता, तरीहि बोलतां बोलतां त्याला केंव्हांच दीड वर्ष संपून गेलें होतें. त्याला गोड पदार्थांची फार आवड असे ह्मणून मी त्याला बतासे, गुळाचे लाडू, साखरदाणे वगैरे गोड जिन्नस खायाला देत असें. परंतु "अशानें लेंकरांची प्रकृति बिघडते," असें रमाबाईनीं मला समजावून सांगि-तल्यावरून नंतर मीं तें बंद केलें. त्या एक जातीचा अर्क घालून घरींच बिस्किटांसारख्या एक प्रकारच्या वड्या करीत व त्यावर साखरेचा पंक चिकटवून 'क' 'ख' 'ग' इत्यादि अक्षरांच्या आकृति काढीत. वत्सलेला नेहमीं याच वड्या त्या खाऊच्या ऐवजीं देत, व मलाहि करण्याची रीत समजावून देऊन माझ्याकडून मधुकरालाहि त्याच देववीत. यायोगें मुलांचा खाऊचा खाऊ होऊन त्यांनां अनायासें अक्षरओळख होत असे. या वड्या दोन प्रकारच्या केलेल्या असत. एक अक्षरांच्या व एक बिन अक्षरांच्या. मुलानें 'क' दे असें सांगि-तलें ह्मणजे त्याला साखर असलेली 'क'च्या आकृतीची वडी द्यावी, व उच्चार केला नाहीं तर साधीच द्यावी. अक्षरांच्या आकृतींच्या

वड्या साध्या वड्यांपेक्षां गोड असल्यामुळें तो 'क' दे, 'ग' दे, 'प' दे, 'म' दे असेंच ह्मणे, व त्याला श्रम न होतां आपोआप अक्षरज्ञान होई. रमाबाईच्या या शिक्षणपद्धतीनें वत्सला आणि मधुकर जरी दोनअडीच वर्षें उमरीचीं होतीं तरी त्यांनां सारीं मूळाक्षरें वाचतां येऊं लागलीं होतीं. शिवाय, पौष्टिक आणि पाचक खुराक मिळत असल्यामुळें त्यांच्या प्रकृतिहि सुदृढ झाल्या होत्या. माझा मधुकर जरी अडीच वर्षांचा होता, तरी त्याला चार वर्षांहून कमी वयाचा आहे असें ह्मणण्याची कोणाची प्राज्ञा नसे ! वत्सलाहि तीन साडेतीन वर्षांची असतांहि चांगली पांचसहा वर्षांच्या मुलीएवढी दिसे. सारा दिवस मुलांच्या अंगावर फ्लानेलचे सैल कपडे असत. त्यांनां नेहमीं स्नानाची संवय पडल्यामुळें आपलें अंग जरा मळीण होतांच तीं आमच्यापाशीं येऊन "शी शी !" असें ह्मणत व त्यांचा मळ पुसून साफ करून जेव्हां तीं पुनः सटसटीत होत, तेव्हांच कोठें त्यांच्या मनाला चैन वाटे. लेंकरांनां काय, त्यांनां आपण जशी संवय लावावी तशीं तीं होतात. निर्मळ राहण्याची संवय लाविल्यास निर्मळ राहतात, घाणेरडें राहण्याची संवय लाविल्यास घाणेरडीं होतात. सद्गुणा-दुर्गुणांचेंहि असेंच आहे. जसें आईचें शिक्षण तसेंच मुलांचें पुढें वर्तन होतें.

रमाबाई लहानपणापासून निश्चयी स्वभावाच्या असल्यामुळें हातीं घेतलेलें कोणतेंहि काम चांगल्या रीतीनें शेवटास नेण्याची युक्ति त्यांनां सहज साध्य झाली होती. कित्येक आळशी बायांप्रमाणें दोन प्रहर दिवस वर येईपर्यंत बिछान्यांत लोळत पडण्याची, किंवा उगाच गप्पा झोडीत बसण्याची खोड त्यांनां नव्हती. घड्याळांत चारांचा ठोका पडतांच त्या बिछाना गुंडाळून ठेवीत. प्रातर्विधि, सडा-

संमार्जन, भांडींकुडीं घांसून साफ करणें, व अंग धुणें इत्यादि कामें आटोपलीं ह्मणजेच त्यांच्या मनाला कोठें स्वस्थता वाटे. मी स्वतः चलाख असें, तरीहि पण रमाबाईंच्या सहवासापासून मी पुष्कळच शिकलें.

प्रकरण एकविसावें.

## नको ती आठवण !

आह्मीं क्षुद्र मानवांनीं मन मानेल तसे बेत करावे, परंतु ईश्वराची योजना कांहीं निराळीच असावी, या नित्य अनुभवांतल्या गोष्टीचा आमच्या खडतर दुर्दैवानें आम्हांला चांगलाच अनुभव दाखविला ! तिकडील अर्धांगवायूचा विकार, डाक्टरांच्या, वैद्यांच्या औषधांनीं आणि हवेच्या व पथ्यपाण्याच्या योगानें बराच कमी झाला होता खरा, पण तो कांहीं निखालस बरा झाला नव्हता. चारसहा महिन्यांनीं तो पुनः पुनः डोकें वर करी व सर्वांनां भिववून सोडी ! जंजिऱ्यास असतांना तेथील नामांकित वैद्यांचीं पुष्कळ औषधें केलीं, झाडपाल्यांचाहि अनुभव घेतला, अगदीं कडकडीत पथ्यें केलीं, परंतु कांहींकेल्या त्या दुष्ट रोगाचें बीज शरीरांतून नाहींसें ह्मणून झालें नाहीं. शेवटीं कंटाळून विशेष औषधपाणी करण्याचा नाद सोडून दिला.

आमच्या नशीबांतच तसा योग होता ह्मणून ह्मण, अथवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें ह्मण, मुंबईतील एका जिवलग स्नेह्याचें एक दिवस तिकडे पत्र आलें. त्या पत्रांत पुढील मजकूर होता:—

"कराची येथें अलीकडे एक नामांकित अमेरिकन डाक्तर आला आहे. तो अर्धांगवायूनें पीडलेला कसाहि रोगी अगदीं अल्प काळांत खात्रीनें बरा करीत असतो. आजपर्यंत त्यानें हजारों लोकांनां बरें केलें आहे. इकडून कराचीला नित्य शेंकडों मंडळी जात आहे व सदर्हु विकारानें अगदीं जर्जर झालेले रोगी—ज्यांनां बरें होण्याची कांहींएक

आशा नव्हती ते—अगदीं रोगमुक्त झालेले मीं माझ्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेहि आहेत. कराचीला त्याचा आणखी अवघा एक महिना मुक्काम आहे. नंतर तो तेथून अफगाणिस्थानांत जावयाचा आहे. यास्तव, ही कधींहि न येणारी संधि आपण फुकट दवडणार नाहीं, अशी मला उमेद आहे. कसेंहि करून आठपंधरा दिवसांची रजा घ्या व कराचीस जाऊन एकवार आपल्या दैवाची परीक्षा पहा!''

आठपंधरा दिवसांचें खडतर उपोषण घडलेल्या एखाद्या दुष्काळ पीडितापुढें अवचित पंचपक्वान्नांचें ताट आलें असतां त्याच्या मनाची जशी स्थिति होते त्याहून विलक्षण स्थिति, वरील पत्रामुळें आमच्या मनाची झाली, हें कांहीं सांगावयाला नको! तिकडचा जरी अगदीं पक्का निश्चय झाला होता, कीं, आतां कसलेंहि औषध घेण्याच्या भानगडींत ह्मणून पडावयाचें नाहीं, तरीहि, असा अनायासें आलेला सुयोग वायां घालविणें, अर्थात्, या दुष्ट रोगाच्या तडाक्यांतून खात्रीनें सुटण्याचा मनांत उद्भवलेला आशांकुर जागच्या जागीं दाबणें, हें मानवीशक्तीच्या बाहेरचें होतें! त्यांतहि आणखी त्या आशांकुराला माधवरावजींनीं अत्यंत आग्रहानें भर दिली, मग काय? तरीहि पण एक अडचण होतीच! बरोबर कोणी पुरुष माणूस हवें होतें. कोंकणांतून कोणाला तरी बोलवून आणीन ह्मणावें, तर अवकाश फार थोडा उरला होता, ह्मणून जरा विचार पडला. परंतु बिचाऱ्या त्या सज्जन माधवरावांनीं हीहि अडचण दूर केली. बापड्याला आमच्या पुढील भोक्तृत्वानुसार बुद्धि झाली कीं काय देव जाणे! ते ह्मणाले ''मीहि आपल्याबरोबर येतों. बरींच वर्षें मींहि रजा घेतलेली नाहीं. तेव्हां अनायासें या कारणामुळें तरी ती घेऊं. शिवाय, उत्तर हिंदुस्थानांत प्रवास करण्याचा माझाहि फार

दिवसांचा हेतु आहे, तोहि अनायासें सिद्धीस जाईल. कराचींतील आपलें काम आटोपलें ह्मणजे पुढें आपण लाहोर, अमृतसर, मथुरा, प्रयाग वगैरे शहरीं जाऊं व सवड झाल्यास काश्मीरहि पाहून येऊं."

मग काय विचारतां ! तिकडे पराकाष्ठेचा आनंद झाला. दोघांनींहि सहा सहा महिन्यांच्या रजेसाठीं तावडतोब अर्ज पाठविले, आणि त्याहूनहि आश्चर्याची गोष्ट ही, कीं, यत्किंचितहि विलंब न लागतां उभयतांचीहि रजा मंजूर झाली! मुंबईस जाण्याचा दिवस ठरला. इकडे मींहि रमाबाईला बरोबर घेण्याचा संकल्प करून माधवरावजींच्या कानावर ही गोष्ट घातली. बिचाऱ्यानें आजवर आमचा एकहि शब्द कधीं मोडला नव्हता, मग आज तरी आमच्या मर्जीविरुद्ध ते कसे जाणार? त्यांतून रमाबाईहि आमच्याबरोबर यावयास उत्सुक होत्या, हें पाहून तर मला अत्यानंद झाला. रमाबाईसारख्या सुशील, विद्याविनयसंपन्न मैत्रिणीच्या समागमानें प्रवास करावयाला मला आनंद व्हावा, ह्यांत नवल नाहीं !

कराचीस जाण्याकरितां आह्मी सर्वजणें तावडतोब मुंबईस आलों. मुंबईत एकदोन दिवस राहून डाक्टराबद्दलची वगैरे खुलासेवार माहिती मिळविल्यानंतर, निकल कंपनीच्या मालाच्या बोटींत बसून आह्मी कराचीस निघालों. आह्मी एकंदर नऊ माणसें होतों. आह्मी उभयतां, आमचा मधुकर, रमाबाई, माधवराव व त्यांची वत्सला, एक ब्राह्मण सैंपाकी आणि कोर्टातील दोन शिपाई.

बोट संध्याकाळीं पांच वाजतां बंदरांतून सुटली. कराचीस पोहोंचण्याचीच कायती खोटी, डाक्टराकडील औषधानें तावडतोब आणि हटकून गुण यावयाचाच ! आतां दूरदूरचीं शहरें लवकरच दृष्टीस पडतील, इत्यादि आनंदसागरांत आह्मी यथेच्छ पोहत होतों. काळजी,

किंवा उद्विग्नता आमच्या मनांत बिलकुल कसली ती नव्हती. या आनंदांतच दुसऱ्या दिवशीं संध्याकाळचे सहा वाजले. या वेळची ती समुद्रांतील अपूर्व शोभा मोठी अवर्णनीय होती ! हळुहळू सूर्य अस्ताचलाच्या खालीं जात होता. क्रमाक्रमानें रात्र पडून अंधकारहि पसरूं लागला व कांहीं वेळानें तर चोहोंकडे दाट काळोख झाला ! बोटींतील विजेच्या दिव्यांचा या वेळचा तो लखलखाट, अंगाला झोंबणारा शीतळ वारा, बोटींतील हौशी इंग्रज, पार्शी वगैरे स्त्रियांनीं आनंदाच्या भरांत चालविलेलें गायन, इत्यादिकांनीं आह्मां सर्वांचीं अंतःकरणें प्रफुल्ल होऊन गेलीं होतीं.

नको तो पुढला प्रसंग व नको ती दुष्ट आठवण ! मीं चांडाळणीनें पूर्वजन्मीं असें कोणतें दुर्धर अघोर पातक केलें होतें, कीं, माझी आज अशी स्थिति झाली ! अरेरे ! ज्या दुष्ट प्रसंगानें माझी आणि माझ्या प्रिय बालकाची, माझ्या परम प्रिय जिवलगाची, पूर्व पुण्याईनेंच लाधलेल्या त्या सहृदय साध्वी रमाबाईची ताटातूट झाली; सुखाच्या अत्युच्च शिखरावरून मी एकदम दुःखदुर्दशारूपी अंध्रकारपूर्ण भयंकर दरींत येऊन पडलें; माझ्या सुखसर्वस्वाची राखरांगोळी झाली; त्या प्रसंगाचें, बेटा मी काय वर्णन करूं ! हाय हाय ! तो प्रसंग आठवला ह्मणजे अंतःकरण थरारून जातें, चित्ताला भ्रम होतो व हृदय अगदीं विव्हल होतें.

संन्यासिनीचा गळा एकदम दाटून आला. तिला दुःखाचें अनावर भरतें आलें. तिच्या दोन्ही नेत्रांतून मोठ्या जोरानें सारखा अश्रुप्रवाह सुरू झाला व ती शोकविव्हल होऊन बराच वेळ अगदीं स्तब्ध राहिली.

यानंतर मला जें कांहीं आठवतें तें मी तुला सांगतें. मी मधुकराला उराशीं घट्ट धरिलें होता; परंतु पुढें तो माझ्या हातून केव्हां आणि कसा सुटला व माझ्या प्रिय बाळाची नंतर काय अवस्था झाली, तें मला अझूनपावेतों कांहींएक समजलें नाहीं. ईश्वर त्याला सुरक्षित ठेवो! मला वाटतें, नंतर मी बेशुद्ध स्थितीमध्यें बरेंच लांब समुद्रामध्यें वाहत गेलें असावी. कारण, शुद्धींत आल्यावर ज्या वेळीं मीं डोळे उघडून पाहिलें, त्या वेळीं मला आढळून आलें, कीं, मी पुनः एका तशाच मोठ्या आगबोटीवर, एका विस्तीर्ण सुशोभित खोलीमध्यें निजलें असून माझ्याभोंवतीं सगळे साहेबलोक जमले आहेत, व त्यांपैकीं एकानें माझी नाडी आपल्या हातांत धरिली आहे. हा त्या बोटीवरील डाक्टर होता, असें मागाहून मला समजलें. या प्रसंगीं अगदीं एकच क्षण मला मनांत वाटलें, कीं, बोट बुडाली वगैरे जें कांहीं आपण पाहिलें, तें फक्त स्वप्नच असावें. आपण त्याच बोटींत असून स्वस्थ निजलों आहों. परंतु बेटा, हा भ्रम अगदीं थोडा वेळच टिकला. लागलीच सर्व स्थिति माझ्या ध्यानांत आली, आणि तें भयंकर चित्र पुनः डोळ्यांसमोर उभें राहिलें. त्यासरशी छातींत धडकी भरून मी अतिशय घाबरून गेलें आणि भीतीनें डोळे घट्ट मिटून पुनः बेशुद्ध झालें.

त्या बिचाऱ्या डाक्टरानें आणि त्या परम दयाळू वृद्ध कप्तानानें मला पुनः शुद्धीवर आणण्याचे अटोकाट प्रयत्न केले. थोड्याच वेळांत मी चांगली सावध झालें. या वेळीं माझें मन बरेंच स्वस्थ झालें होतें. बराच वेळ मला अगदीं स्वस्थ पडूं दिल्यावर त्या वृद्ध कप्तानानें हिंदुस्थानी भाषेंत मला माझी हकीगत विचारली. मींहि त्याला सगळें सांगितलें. माझी ती करुणाजनक हकीगत ऐकून त्या

कप्तानाचें व तेथें जमलेल्या सर्व मंडळीचें हृदय कळवळलें. सर्वांनां मनस्वी वाईट वाटलें. कप्तान मला धीर देऊन ह्मणाला " बाई, तुह्मी भिऊं नका. देव लवकरच तुमची आणि तुमच्या पतिपुत्रांची भेट करवील. आमची बोट थेट कराचीला जाणार आहे, तेथें तुह्मांला उतरूं, तुह्मी दुःख करूं नका. "

बेटा, त्या दयाळू कप्तानाचे उपकार मीं कसे फेडावे ? त्या वेळीं, त्या साधुपुरुषाचे नुसत्या शब्दांनींच आभार प्रदर्शित करण्याशिवाय मजपाशीं दुसरें काय होतें ! बोटींतून उतरतांना मीं त्या वृद्ध कप्तानाचे पाय घट्ट धरून मनांतल्या मनांत त्याचे पुष्कळ आभार मानिले व देवापाशीं त्याचें बरें मागितलें. कप्तानानेंहि मला प्रेमानें निरोप दिला. असो. कशीबशी मी एकदाची किनाऱ्यावर येऊन उतरलें.

किनाऱ्यावर उतरलें खरी, परंतु आतां पुढें काय करावें, हा मला मोठा विचार पडला. एकतर जातीनें स्त्री, निराधार, कोणाचीहि ओळख नाहीं. गांवांत कोठें जावें व कोणाकडे उतरावें, हेंहि समजेना. मनांत एक वेळ असाहि विचार आला, कीं, अशा या दुःखी जिण्यामध्यें दिवस कंठावे, त्यापेक्षां येथेंच समुद्रांत उडी घेऊन या सर्व संकटांतून मुक्त व्हावें, हेंच चांगलें. परंतु आत्महत्या करणाराला अक्षय रौरव नरकामध्यें पडावें लागतें, हा विचार मनांत उभा राहून मति कुंठित झाली. दुःख शोक, निराशा इत्यादिकांनीं माझें मन अगदीं अस्वस्थ आणि उद्विग्न होऊन गेलें. पुढें करावें काय आणि जावें कोठें, हें बिलकुल सुचेना. बराच वेळ एखाद्या भ्रमिष्टासारखी बसून राहिलें. नंतर मनामध्यें विचार केला, कीं, काय होईल तें होवो, परम दयाळू परमेश्वराच्या इच्छेनेंच आज

आपली अशी दशा झाली आहे, त्याच्यावरच सर्व भरिभार ठेविला असतां तोच या संकटांतूनहि आपल्याला सोडविल्याविना राहणार नाहीं. असा मनाचा ठाम निर्धार करून मी एकदम उठून उभी राहिलें व रस्ता दिसत होता तिकडे एकसारखी जाऊं लागलें. सारा दिवस भटकून एकदाची धर्मशाळा धुंडाळून काढली व तेथें जाऊन उतरलें. बिचाऱ्या कसानानें कांहीं उबदार कपडे व खर्चाकरितां कांहीं पैसे मला दिले होते, त्यांवर कसाबसा आठपंधरा दिवस गुजारा केला.

एके दिवस रात्रीं धर्मशाळेंत निजलें असतां मला स्वप्नांत असा दृष्टांत झाला, कीं, कोणीएक दिव्य पुरुष, भगवीं वस्त्रें परिधान करून माझ्यासमोर आला आहे. मीं त्याला नमस्कार केला. त्यानें माझ्या मस्तकावर हात ठेवून मला आशीर्वाद देऊन ह्मटलें " मुली, भिऊं नको. तुझा पति आणि पुत्र सुरक्षित आहेत. आजपासून बरोबर बाराव्या वर्षीं तुह्मां सर्वांची भेट होईल. तोंपर्यंत तूं बैरागिणीचा वेष धारण करून लोकांनां सदुपदेश करीत तीर्थयात्रा कर." इतकें बोलून तो सत्पुरुष अदृश्य झाला व मीहि खडबडून जागी झालें.

स्वप्नांतील दृष्टांतावर पूर्ण भरवंसा ठेवून दुसरे दिवशीं सकाळीं मीं बैरागिणीचा वेष धारण केला व भिक्षा मागत मागत तीर्थयात्रा करण्याला निघालें. मथुरा, वृंदावन, बदरीकेदार, प्रयाग, काशी इत्यादि अनेक पुण्यक्षेत्रांचें दर्शन घेत व लोकांनां सन्मार्गाचा उपदेश करीत करीत सहा महिन्यांपूर्वीं मी इकडे मुंबईंत आलें. पुष्कळ दिवस महालक्ष्मीच्या मंदिरांतच राहत होतें. हल्लीं या जागीं आलें आहें. गांवामध्यें

लोकांनां उपदेश करण्यासाठीं संध्याकाळच्या वेळीं समुद्रकिनाऱ्यावर जात असतें व त्याचप्रमाणें जेथें जेथें म्हणून लोकसमूह जमत असतो तेथें तेथें व्याख्यानें देत असतें. आज सतत सहा महिने माझा हा क्रम चालू आहे. तुझी माझी भेट वरील ठिकाणींच झाली. माझी ही आजपर्यंतची हकीगत मीं तुला अगदीं संक्षिप्तपणें सांगितली. पुढें काय घडेल तें प्रभूला माहीत.

## प्रकरण बाविसावें.

# साखळी.

संन्यासिनीचा आतांपर्यंतचा वृत्तांत, तिच्याच मुखानें वाचकांनीं ऐकलाच आहे. परंतु बाकीच्या मंडळीची हकीगत काय घडली तें जाणण्याविषयीं कुसुमकुमारीप्रमाणेंच आमच्या प्रिय वाचकांचींहि मनें उत्सुक होणें साहजिक असल्यामुळें या प्रकारणांत पुढील हकीगत सांगण्याचें आह्मीं योजिलें आहे.

दैवदुर्विपाकानें ती फुटलेली आगबोट समुद्राच्या तळाशीं जातांच आंतील पांचपन्नास मंडळीशिवाय बाकीची सर्व मंडळी इहलोकींच्या दुःखांपासून मुक्त होऊन पंचतत्वांपैकीं एकामध्यें लीन झाली. क्षणांत त्यांच्या सर्व काळज्या, सर्व यातना नष्ट झाल्या. परंतु प्रियंवदेप्रमाणें ज्यांच्या आयुष्याची दोरी अझून तुटली नव्हती, तीं मात्र पाण्यामध्यें गटंकळ्या खात खात, वारा आणि प्रवाह जिकडे नेईल तिकडे वाहत चाललीं होतीं. कित्येक पोहण्याच्या कलेंत प्रवीण होतीं त्यांनीं आपली होती नव्हती तेवढी शक्ति खर्चून आणि आगबोटीमधील तक्ते, रबरी कडीं इत्यादिकांच्या साह्यानें एकदोन दिवस तग काढला. कित्येक निचेष्ट स्थितींतच तक्त्यांच्या, कड्यांच्या वगैरे साह्यानें पुढेंपुढें वाहत चाललीं. कोणी समुद्रांत आंत वाहूं लागलीं. कोणी किनाऱ्याच्या बाजूला व कोणीकोणीतर खाडीमध्यें घुसलीं. ज्यांचें दैव सबळ होतें त्यांनां समुद्रामधून जाणाऱ्या बोटींतील मनुष्यांनीं व मासे मारण्यासाठीं निघालेल्या होड्यांतील कोळ्यांनीं वांचविलें; परंतु ज्या बिचाऱ्यांनां वेळेवर

साह्य पोंचलें नाहीं त्यांनां अखेरीस जलसमाधि मिळाली. सुदैवानें मधुकर आणि वत्सला एका लांकडी तक्त्याला बांधलेलीं एका खाडींत वहात आलीं. मासे मारून परत येत असलेल्या एका होडींतील कोळ्यांची दृष्टी त्यांच्याकडे जातांच एकानें पाण्यांत उडी टाकून मुलांनां आपल्या होडींत घेतलें व त्यांनां सावध करून किनाऱ्यावर आणलें. पुढें त्या कोळ्यांनीं पोलीसपाटिलाला याबद्दल वर्दी दिली. त्याप्रमाणें गांवफौजदार, तलाठी, पोलीसपाटील वगैरे मंडळी जमली. समुद्रामध्यें दोन मुलें मिळालीं आहेत, ही बातमी गांवांत पसरतांच त्यांनां पाहण्यासाठीं किनाऱ्यावर लोकांच्या झुंडीच्या झुंडी जमूं लागल्या. आपल्या सभोंवार बरीच अनोळखी मंडळी जमलेली पाहतांच बिचारीं तीं मुलें फार घाबरून रडूं लागलीं. कोळ्यांची व दुसऱ्या कित्येक साक्षींची जबानी घेतल्यावर पोलीसपाटिलानें त्या मुलांनां एका ब्राह्मणाच्या हवालीं करून त्यांची योग्य व्यवस्था ठेवण्याची त्याला आज्ञा केली. एक दोन दिवसांनीं त्या दोघां मुलांकडूनहि थोडासा सुगावा लागला. त्या माहितीच्या आधारानें पोलीसपाटिलानें मामलेदाराकडे रिपोर्ट केला व मामलेदारानें वरील संक्षिप्त हकीगत मुंबईंतील व दुसऱ्या कित्येक वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करून मुलांचे कोणी पालक असल्यास त्यांनीं मुलांनां घेऊन जावें, अशी जाहिरखबर दिली. सदर्हू जाहिरातीवरून मुंबईंतील स्नेहीमंडळीनें मुलांनां आपल्यापाशीं आणिलें. मुलें सांपडलीं, परंतु त्यांचीं आईबापें समुद्रांत बुडालीं, त्यांचा कांहींएक पत्ता नाहीं, हें पाहून सर्व मंडळी फार दुःखी झाली. गांवोगांव पत्रें पाठवून व इतर बराच शोध करून, मुंबईंतील स्नेह्यांनीं बुडालेल्या मंडळीच्या तपासा-

संबंधीं बराच प्रयत्न केला; परंतु कांहींएक उपयोग झाला नाहीं. पुढें स्नेहीमंडळीनें मनोहरपंतांच्या आणि माधवरावांच्या घरीं पत्रें पाठविलीं. माधवराव जंजिऱ्यास भाड्याच्या घरांत राहत होते. त्यांच्या कुटुंबांत कोणीहि नव्हतें, त्यामुळें वत्सलेचा समाचार घ्यावयाला कोणीहि आलें नाहीं. परंतु मधुकराला नेण्याकरितां त्याचे आजोबा धावून आलें. आपला कर्तासवरता मुलगा व सून समुद्रामध्यें बुडाल्याचें वर्तमान ऐकून त्यांनां पराकाष्ठेचें दुःख झालें. पुढें आपला नातू व मुलाच्या मित्राची कन्या यांनां बरोबर घेऊन ते आपल्या गांवीं गेले.

बुडालेली मंडळी जिवंतपणें किनाऱ्यास लागली होती, असा पुष्कळ दिवसांनीं थोडासा थांग लागला; परंतु पुढें त्यांची काय वाट झाली, याचा सुगावा मिळाला नाहीं. आपला मुलगा व सून नाहींशीं झाल्याची भयंकर बातमी ऐकतांच बिचाऱ्या मनोहरपंतांच्या मातापितरांच्या अंतःकरणाला जबरदस्त धक्का बसला. त्या दुःखानें झुरणीस लागून तीन महिन्यांच्या आंतच उभयतांनींहि देह ठेवले. मनोहरपंतांचा सख्खा वडील भाऊ निपुत्रिक स्थितींत दोन वर्षांपूर्वींच निवर्तला होता.

प्रियंवदेच्या सासरच्या घरची अशी हालहवाल होऊनच संपलें नाहीं. तिच्या माहेरींहि पडत्या दशेचें वादळ कोसळलें. नुकताच एल्. एल्. बी. ची परीक्षा पास झालेला प्रियंवदेचा भाऊ एकाएकीं पटकीच्या आजारानें मरण पावला. पुत्रशोकानें प्रियंवदेची आई झुरणीस लागून तिला क्षयाची व्याधि जडली. इतक्यांत मुलीची आणि जांवयाची अमंगल बातमी ऐकतांच त्या बिचारीची कंबरच खचली व ती आठपंधरा दिवसांतच हें जग सोडून चालती झाली.

आमचे सदोबा—या स्वारीला आमचे वाचक विसरले नसतील—जे म्युन्सिपालिटींत १५ रुपयांवर नाकेदार होते, त्यांच्या हातीं या वेळीं घरचा सर्व कारभार आला. मनोहरपंतांचा धाकटा भाऊ गणपतराव हा या वेळीं मुंबईंत इंटरमिजियेटचा अभ्यास करीत होता. बंधूच्या आकस्मिक मृत्यूमुळें आणि वृद्ध मातापितरांच्या वियोगामुळें, गणपतरावांची सर्व स्थिति बदलली. त्यांनां आपला अभ्यास सोडून देणें भाग पडलें. हलुहळू स्त्रियांमुळें घरांत तंट्याभांडणांस सुरुवात झाली. वडिलार्जित मिळकतींत थोडासा जीव होता, परंतु सर्वगुणसंपन्न सदोबांनीं कावेबाजपणानें सगळ्या जिंदगीवर डल्ला मारून चुलत भावाच्या हातीं नारळ दिला. गणपतराव मानी होता. वडिलार्जित इष्टेटीची त्यानें मुळींच पर्वा केली नाहीं. उलट, वडिलार्जित इष्टेटीचा हिस्सा घेण्याचें साफ नाकारून स्वतःच्या पराक्रमावरच कोठेंतरी उदरनिर्वाह करीन अशी प्रतिज्ञा केली व तो एका मित्राच्या आश्रयानें स्त्रीसहवर्तमान पुनः मुंबईस आला. सदोबांच्या हातीं सगळा कारभार आणि इष्टेट येतांच “ मधुकराचा आणि वत्सलेचा प्रतिपाळ करण्याला आपण कांहीं बांधलेले नाहीं, ” असें साफ सांगून दोन्ही मुलें त्यांनीं गणपतरावांच्या गळ्यांत घातलीं. गणपतराव ह्मणाले “ जेथें आह्मी तेथें हीं मुलें! आम्हांला तीं मुळींच जड नाहींत ! ” गणपतरावांचा पुढें अभ्यास चालविण्याचा पहिल्यानें विचार होता; परंतु असा सगळाच संसार गळ्यांत पडल्यामुळें निर्वाहापुरतें कमवितां कमवितांच त्यांच्या नाकीं नऊ येऊं लागले.

सद्गुणी मनुष्य कधींहि दुःखी होत नाहीं. तो सगळ्यांनां प्रीतिपात्र होतो. ईश्वर त्याला प्रत्येक गोष्टींत साह्य करितो, हें आपण

प्रत्यहीं पाहत असतोंच. गणपतरावांनांहि या गोष्टीचा चांगलाच अनुभव आला. एका श्रीमान् गृहस्थाच्या मुलाला इंग्रजी शिकविण्या-करितां एक शिक्षक पाहिजे होता. याबद्दल त्यानें वर्तमानपत्रांत जाहिरात दिली होती. गणपतरावांचें लक्ष्य त्या जाहिरातीकडे जातांच त्यांनीं आपल्या एका मित्राकडून खटपट करवून त्या गृहस्थांनां एका मोठ्या गृहस्थांचें शिफारसपत्र लाविलें व ती जागा मिळविली. ज्या गृहस्थाच्या मुलाला गणपतराव शिकवावयाला जात असत त्यांचें नांव नारायणराव पुणेकर असें होतें. पुणेकरांच्या बंगल्याशेजारींच रामभाऊ देशमुख नांवाचे एक श्रीमान् वृद्ध व्यापारी रहात असत. हे व्यापारानिमित्त बरींच वर्षें ब्रह्मदेशांत होते, परंतु अलीकडे व्यवसायांतून लक्ष्य काढून त्यांनीं मुंबई येथेंच आपली कायमची वस्ती केली होती. त्यांच्या कुटुंबांत फक्त दोनच माणसें होतीं, एक ते स्वतः व दुसऱ्या त्यांच्या सुशील पत्नी राधाबाई! रामभाऊंनीं धंद्यामध्यें बराच पैसा कमविला असल्या-मुळें हल्लीं वार्धक्यामध्यें ते त्याचा यथायोग्य उपभोग घेत होते. ते राहत होते तो बंगला त्यांचा स्वतःचा होता; शिवाय गिरगांव, ग्रांटरोड वगैरे चांगल्या वस्तीच्या लत्त्यांत त्यांच्या मालकीच्या कित्येक चाळी होत्या. ब्यांकेंत बरेच पैसे होते. शिवाय, कित्येक कंपन्यांमधून त्यांचे शेअर्सहि होते. पुणेकरांपासून गणपत-रावांची रामभाऊंशीं ओळख झाली. पुढें वारंवार येणेंजाणें होऊं लागल्यामुळें हळुहळू त्यांच्या घरीं गणपतरावांचा बराच घरोबा झाला. कधीं कधीं जेवायाखावयासहि ते त्यांच्या घरीं राहूं लागले, व उभयतां नवराबायकोचें गणपतरावांवर प्रेम जडलें.

रामभाऊंचा व त्यांच्या पत्नी राधाबाई यांचा फार आग्रह पडल्यामुळें एक दिवस गणपतराव सहकुटुंब रामभाऊंच्या घरीं जेवावयास आले होते. गणपतरावांनां मूलबाळ कांहींएक नसल्याचें त्यांच्याच तोंडून रामभाऊंनां माहीत झालें होतें, तेव्हां आज हीं त्यांच्याबरोबर असलेलीं दोन मुलें कोणाचीं? असा साहजिकच प्रश्न निघाला. रामभाऊंचा हा प्रश्न ऐकून गणपतरावांनां पराकाष्ठेचें दुःख झालें. आपल्या प्रिय बंधूचें आणि सुशील वहिनीचें त्यांनां स्मरण होऊन त्यांचें अंतःकरण शोकविव्हल झालें. त्यांनीं वडील बंधूची सविस्तर हकीगत रामभाऊंनां सांगितली आणि ह्मटलें "ही मुलगी–वत्सला ही त्यांचे परम मित्र माधवराव यांची कन्या होय."

रामभाऊ ही हकीगत मोठ्या उत्सुकतेनें ऐकत होते. संपूर्ण हकीगत ऐकून अगदीं निकट आप्ताप्रमाणें ते पराकाष्ठेचे दुःखी झाले. त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले. ते म्हणाले "गणपतराव! तुह्माला कदाचित् माहीत नसेल, परंतु तुमचे ज्येष्ठ बंधु मनोहरपंत हे माझे सहाध्यायी असून अत्यंत जिवलग मित्र होते. माधवराव तर आमच्या आप्तांपैकींच होत. तुमच्या तोंडून ही हकीगत ऐकून मला अतोनात दुःख तर होत आहेच, परंतु अशा जिवलग मित्राच्या उपयोगीं पडण्याची संधी ईश्वरानें आज मला दिली, हें मी माझें पूर्वपुण्यच समजतों. तुमचा आमचा संबंध हा नव्यानें झाला आहे असें तुह्मी समजूं नका. तुमच्यावरच हा ईश्वरी कोप झाला नाहीं, आह्मीहि त्याचे वांटेकरी आहों, हें मी तोंडानें सांगावें असें नाहीं."

रामभाऊंचा गळा दाटून आला. ते स्तब्ध राहिले. कांहीं वेळ गेल्यानंतर त्यांनीं पत्नीला हांक मारिली. राधाबाई बाहेर येतांच

रामभाऊ गणपतरावांकडे बोट दाखवून ह्मणाले "यांनां ओळखलेंस का?"

राधाबाई हा विलक्षण प्रश्न ऐकून अचंब्यांतच पडल्या. त्या ह्मणाल्या "असं काय मेलं चमत्कारिक विचारणं तरी! आजच का हे नव्यानें आपल्याकडे आले आहेत, मीं यांनां ओळखायला?"

"तें समजलें; परंतु यांचा आपला कांहीं नवाच संबंध नाहीं! आपले मनोहरपंत, गिरगांवांत ट्रॅम्वेच्या नाक्यावर राहत होते नाहीं का, त्यांचे हे कनिष्ठ बंधु!"

"आं! खरंच कीं काय? भावोजी हल्लीं कुठं असतात? प्रियंवदाबाई खुशाल आहेत ना?" इत्यादि माहिती राधाबाई उत्कंठेनें विचारूं लागल्या. गणपतरावांचे डोळे पाण्यानें भरून आले व ते जमिनीकडे पाहूं लागले. रामभाऊंनीं सद्गदित स्वरानें पत्नीला सर्व हकीगत सांगितली. सर्व मंडळीची ही हालहवाल ऐकतांच राधाबाईंचें तोंड काळवंडून गेलें. डोळ्यांतील अश्रु पुसतांपुसतां लुगड्याचा पदर भिजून गेला. माधवराव आणि त्यांची पत्नी यांची हकीगत ऐकूनतर त्यांचें दुःख अनावर झालें. वत्सलेला "ये बाळ," असें ह्मणून त्यांनीं मोठ्या प्रेमानें पोटाशीं धरलें आणि कन्येप्रमाणें तिला कडकडून आलिंगन दिलें. पुढें रामभाऊंनीं वत्सलेला आपल्याच घरीं ठेवून घेतलें. राधाबाईंनीं प्रेमानें तिचें पूर्वींचें नांव बदलून कुसुम हें नवें नांव ठेविलें, व आपल्या मुलीप्रमाणें त्या तिचे लाड करूं लागल्या.

गणपतराव हे जसे सुशील आणि निर्मळांतःकरणाचे होते, त्याचप्रमाणें त्यांची पत्नी लक्ष्मीबाई हीहि अत्यंत साध्वी होती. पतीला संतुष्ट ठेवणें यांतच ती आपला संतोष मानीत असे. पतीची इच्छा तीच

आपली इच्छा, पतीचा विचार तोच आपला विचार, असें ती समजत असे व त्याप्रमाणेंच सदैव वागे; आणि यामुळें हें दंपत्य पूर्ण सुखी होतें. "वडिलार्जित इष्टेटीचा हिसा त्याला कां म्हणून सोडायचा ? करा फिर्याद आणि घ्या मेल्याकडून हिसकावून !" वगैरे भाषणांनीं नवऱ्याला चिथावून कांहीं बायका घरामध्यें भयंकर कलहाग्नि पेटवून देतात, व अखेरीस सर्व कुटुंबाची राखरांगोळी करविण्याला कारणीभूत होतात. परंतु आमच्या लक्ष्मीबाईनीं त्याच्या उलट "न का मेला हिस्सा मिळेना ! आपलं नशीब तर नाहींना त्याबरोबर जात ? इंथं नाहीं दुसरीकडे, कुठंहि उद्योग करूं नि पोट भरूं. मेली कसली ती वडिलांच्या पैशाची आशा ? ज्यांच्या अंगीं पुरुषार्थ नाहीं त्यांनींच असल्या निर्जीव धनाची आशा करीत बसावं ! आह्मांला तें फुकट मिळालं तरी नको ! शिवाय, तें कुणी परका का बळकावून बसला आहे ? आपलेच भाऊबंद. त्याचा उपयोग त्यांनीं घेतला काय, आणि आपण घेतला काय, एकून एकच ! बाहेर तर नाहींना जात? त्यांचं सुख तेंच आपलं सुख, त्यांत वाईट वाटायचं तें काय आहे ?" असें मोठ्या पोक्त विचारानें नवऱ्याचें समाधान करून आपणहि चिरकाल संतोषित वृत्तीनें ती वागत असे. सुशील, सद्गुणी आणि आनंदी भार्येपुढें इतर सर्व सुखें तुच्छ आहेत ! गणपतराव याबद्दल आपणास परम भाग्यशाली मानीत. सांप्रत त्यांना सर्व सुखें अनुकूल होतीं. कायती एक अपत्यसुखाचीच उणीव होती. तरी वडील भावाच्या मुलाला आपल्या मुलाच्या ठिकाणीं मानून ते मनाचें समाधान करीत व त्याला सुशिक्षण देण्याच्या कामीं तनुमनधनेंकरून झटत. याप्रमाणें हें सुशील जोडपें मोठ्या सौख्यांत काळ कंठीत होतें.

प्रकरण तेविसावें.

## अस्तोदय.

काळाची गति विचित्र आहे. लोक आपलें काम करोत किंवा न करोत, परंतु काळ आपली कामगिरी बजावीत असतोच. इतर व्यवहार कांहीं काल चालून एखादे वेळीं थांबतील, परंतु काळाचा व्यवहार अगदीं अव्याहत सुरू असावयाचा. त्याची गति कधींहि कुंठित होत नाहीं. तो आपल्या नित्यक्रमाप्रमाणें पुढें पुढें चाललेलाच असतो.

आमच्या प्रियंवदेला पतिवियोग होऊन हां हां ह्मणतां आज बारा वर्षें होऊन गेलीं. या बारा वर्षांत कितीकतरी गोष्टी घडून आल्या असतील. सुखाच्या अत्युच्च शिखरावर आनंदानें वास्तव्य करणारे कितीकतरी प्राणी, या बारा वर्षांमध्यें दुःखरूपी भयंकर दरींत पडून आक्रोश करीत असतील. त्याचप्रमाणें दुःखाग्नींत होरपळलेले कितीकतरी प्राणी सुखसमुद्रांत यथेच्छ पोहत असतील. गणपतरावांच्या घरींहि आज दुःखक्लेशाचें नांव नाहीं. त्यांच्या सौख्यांत जी उणीव होती तीहि ईशकृपेनें लवकरच दूर झाली. त्यांची इच्छा पूर्ण होऊन एक गुणवान् पुत्र आणि एक सुस्वरूप, सद्गुणी कन्या अशा दोन अपत्यांचा त्यांनां लाभ झाला. कुसुमहि चौदापंधरा वर्षांची झाली. हा वेळपावेतों तिच्या आईबापांचा कांहींएक पत्ता लागला नव्हता. कुसुम उपवर झाल्याकारणानें तिला अनुरूप वर शोधण्याच्या तयारीला रामभाऊ लागले होते. तेच तिला आतां आईबापांच्या ठिकाणीं होते. शिवाय, त्यांच्या

घरीं दुसरें मूलबाळ नसल्याकारणानें स्वाभाविकपणेंच उभयतां नवराबायकोला कुसुमचा पराकाष्ठेचा ळळा लागला होता. रामभाऊंनीं तिला शाळेंत घातलें होतें. कुसुम मराठी पांच पुस्तकें शिकून हल्लीं इंग्रजी सहाव्या इयत्तेचा अभ्यास करीत होती. ती फार बुद्धिवान् मुलगी असून तिला विद्येची मोठी आवड होती. इंदिरानामक आपल्या एका समवयस्क मैत्रिणीसह चाकरास बरोबर घेऊन ती नेहमीं समुद्रावर फिरावयास जात असे. ब्याकबेवर एक संन्यासिनी सायंकाळच्या वेळीं उपदेशपर भाषण करीत असते, हें कुसुमला समजतांच ती मोठ्या उत्सुकतेनें नेहमीं तेथें जाऊन संन्यासिनीचीं सर्व भाषणें अगदीं नेमानें ऐके. संन्यासिनीच्या मोहक आणि रसाळ वाणीनें कुसुमचें चित्त वेधून गेलें, व तिच्या मनांत संन्यासिनीविषयीं साहजिक प्रेमांकुर उत्पन्न झाला. दिवसेंदिवस हा प्रेमांकुर वाढत जाऊन शेवटीं संन्यासिनीवर तिची दृढ भक्ति बसली. पुढें संन्यासिनीचा पूर्व वृत्तांत समजून घेण्याची अनावर जिज्ञासा तिच्या मनांत उत्पन्न झाली व ती तृप्त करून घेण्यासाठीं इंदिरेसह कुसुम संन्यासिनीच्या बिऱ्हाडीं गेली, आणि तिला अति आग्रहानें विनंति करून तिच्याकडून तिचा समग्र वृत्तांत तिनें समजून घेतला, वगैरे हकीगत वाचकांनां ठाऊकच आहे.

संन्यासिनीचा तो अद्भुत आणि दुःखमय वृत्तांत तिच्या तोंडून ऐकून कुसुमकुमारीचें कोमल अंतःकरण सद्गदित होऊन गेलें व किती वेळतरी ती तिच्या तोंडाकडे टकटक पाहत राहिली. अशा सदाचरणी साध्वी स्त्रीला सोडून जावें, असें कुसुमला वाटेचना! शेवटीं बराच वेळ झाला असें पाहून इंदिरेनें तिला घरीं जाण्याची

आठवण केली. कुसुमकुमारीनें एक मोठा सुस्कारा सोडून संन्यासिनीचा निरोप घेतला आणि ती घरीं आली.

कुसुमला संन्यासिनीचें इतकें वेड लागलें होतें, कीं, आतांशीं ती आपला बहुतेक वेळ तिच्याच संगतींत घालवी. त्याप्रमाणेंच संन्यासिनीलाहि कुसुमचा फार ओढा लागला होता. आईची परवानगी मिळवून एक दिवस कुसुमकुमारीनें संन्यासिनीला आपल्या घरीं येण्याविषयीं विनंति केली आणि संन्यासिनीनेंहि ती मोठ्या आनंदानें मान्य करून ती ताबडतोब कुसुमबरोबर तिच्या घरीं आली. राधाबाईनीं संन्यासिनीचें आगतस्वागत करून बराच वेळ तिला आपल्या घरीं ठेवून घेतलें. पुढें त्यांचें बरेंच संभाषण झाल्यावर संन्यासिनीला आपलें घर दाखविण्याच्या हेतूनें राधाबाईनीं तिला सर्व खोल्यांतून हिंडविलें. याप्रमाणें प्रत्येक खोलींतून फिरत असतां राधाबाईच्या निजावयाच्या खोलींत संन्यासिनी गेली. तेथें कित्येक तसबिरी भिंतीवर टांगल्या होत्या, त्या पहातपहात सारी मंडळी चालली असतां एका तसबिरीकडे पाहून संन्यासिनी एकदम दचकून उभी राहिली. तिच्या चेहऱ्यावर विलक्षण विकारांची छाया दिसूं लागली व ती मोठ्या आश्चर्यांत पडली.

ज्या इष्टदेवतेच्या प्राप्तीसाठीं तिनें या संन्यासव्रताची दीक्षा घेतली होती, ती रात्रंदिवस एकनिष्ठेनें ध्यान करीत असे, ज्याच्या मंगल नामाचा तिनें अखंड जप चालविला होता, त्या आपल्या परम प्रिय पतीची तसबीर तेथें दृष्टीस पडतांच संन्यासिनीची चित्तवृत्ति चमत्कारिक होणें साहजिक होतें. मनोहरपंतांनीं मोठ्या आवडीनें आपली व आपल्या प्रियपत्नीची काढविलेली ही तसबीर होती. या स्थितींत ती तसबीर दृष्टीस पडतांच संन्यासि-

नीला फार आनंद झाला. इतकीं वर्षें विरह झालेल्या प्रिय पतीची नुसती तसबीरच कां होईना, तिच्या दृष्टीस पडतांच संन्यासिनीचें चित्त विव्हल झालें व तिला प्रेमाचें अनावर भरतें येऊन डोळ्यांतून टपटप अश्रु गळूं लागले.

त्या तसबिरीकडे टक लावून संन्यासिनी राधाबाईंनां ह्मणाली "बाईसाहेब, ह्या तसबिरींतील ही मूर्ति, मीं कुठेंतरी पाहिली असावीसें वाटतें. आपल्या घरीं ही तसबीर कशी आली? ही मंडळी आपल्या ओळखीची आहे काय?"

यावर राधाबाईंनीं मनोहरपंतांची सविस्तर हकीगत संन्यासिनीला सांगितली. ती ऐकत असतां संन्यासिनीची चित्तवृत्ति कांहीं चमत्कारिकच होऊन गेली. ती अगदीं कावरीबावरी होऊन वेड्यासारखें करूं लागली. आतां ती कांहीं गहन विचारांत पडल्यासारखी दिसली. पुनः ती कांहीं विशेष गोष्टीचें स्मरण करण्याचा यत्न करीत आहेशी दिसली. आपणाबरोबरच समुद्रांत बुडाल्यामुळें आजवर ज्याचा आपला वियोग झाला होता, तो आपला एकुलता एक प्रिय पुत्र मधुकर येथेंच सुखरूप असून आपला दीर वगैरे मंडळीहि येथेंच आहे; ही लक्ष्मीबाई आपली धाकटी जाऊ आहे; आजपर्यंत जिला आपण कुसुम या नांवानें ओळखित होतों ती दुसरी कोणी नसून आपली प्रिय मैत्रीण रमाबाई यांची कन्या वत्सलाच होय, वगैर गोष्टी राधाबाईंच्या तोंडून समजतांच संन्यासिनी आनंदसागरांत पोहूं लागली. ईश्वराच्या अगम्य लीलेचें तिला मोठें कौतुक वाटूं लागलें व मनांतल्या मनांत ती त्याचे धन्यवाद गाऊं लागली.

संन्यासिनीची अशी चमत्कारिक स्थिति कां झाली, हें राधाबाईंच्या कांहीं केल्या लक्ष्यांत येईना. त्या अगदीं विस्मयांत पडल्यासारख्या होऊन संन्यासिनीकडे टकमक पहात राहिल्या. इतक्यांत मधुकर तेथें आला. त्याला पाहतांच तर संन्यासिनीचें हृदय पुत्रस्नेहानें उचंबळूं लागलें! मधुकरहि प्रेमपूर्ण दृष्टीनें संन्यासिनीकडे पाहूं लागला. संन्यासिनी किंचित्काळ मधुकराकडे आणि नंतर कुसुमकुमारीकडे याप्रमाणें आळीपाळीनें पहात राहिली. तिनें आपलें मन आंवरण्याचा कितीतरी प्रयत्न केला, परंतु अनिवार पुत्रस्नेहापुढें तिचे बिचारीचे ते मिथ्याप्रयत्न जागच्याजागींच लटपटून गेले! आनंदातिशयानें संन्यासिनीचें देहभान हरपून जाऊन "माझ्या रत्ना मधु! बाळे वत्सले!" असें ह्मणून तिनें त्या दोघांहि मुलांनां प्रेमभरानें हृदयाशीं कंवटाळून घट्ट धरिलें आणि ती त्यांच्यावर आनंदाश्रूंचा सारखा वर्षाव करूं लागली. या अतुल आनंदाचा थोडा वेळ उपभोग घेतल्यानंतर तिनें मोठ्या प्रेमानें आपल्या जाऊला आलिंगन दिलें व राधाबाईंच्या पायांवर डोकें ठेवून आनंदाश्रूंचें त्यांनां स्नान घातलें. राधाबाई हा एकंदर प्रकार पाहून पराकाष्ठेच्या विस्मयांत पडल्या. त्यांनां संन्यासिनीच्या या गूढ वर्तनाचा कांहींच अर्थ कळेना. त्या गोंधळून गेल्या. तीच स्थिति इतर मंडळीची झाली. शेवटीं राधाबाईंनीं हिय्या करून संन्यासिनीला विचारिलें "माई, आपण हें काय मांडलं आहे!"

संन्यासिनीनें सद्गदित कंठानें आपली सर्व हकीगत राधाबाईंनां सांगितली आणि ह्मटलें "मीच ती अभागी प्रियंवदा. आपले मजवर असंख्य उपकार झाले आहेत. भावोजी कुठें आहेत?—"

त्यांचें वरील संभाषण चाललें आहे तोंच रामभाऊ, गणपतराव वगैरे मंडळी आंत आली. त्यांनां ही हकीगत समजतांच पराकाष्ठेचा आनंद झाला. बंगल्यांत जिकडेतिकडे आनंदीआनंद होऊन गेला. इतकीं वर्षे वियोगदु:खांत घालविल्यानंतर आज हा असा भेटीचा जमून आलेला अकल्पित योग पाहून, एकंदर मंडळीला जो आनंद झाला त्याची वाचकांनींच कल्पना करावी! तरीहि आपल्या प्रियपतीच्या आणि त्या प्रेमळ जोडप्याच्या—माधवराव आणि रमाबाई यांच्या—भेटीचा परमेश्वर कधीं सुयोग आणील, या विचारानें संन्यासिनीच्या आनंदांत बरेंच विरजण पडलें. स्वप्नांतील सिद्ध पुरुषाच्या वचनावर तिचा पूर्ण विश्वास होता, आणि बऱ्याच गोष्टींचा आजवर तिला अनुभवहि आला होता, त्यामुळें तर तो विश्वास अगदीं दृढ झाला होता. आपल्या प्रियपतीची आणि आपल्या मैत्रिणीची भेट होणार, असें तिला खास वाटत असे. आणि त्याच आशेवर ती आपल्या मनाची समजूत घालीत असे. असो. यापुढें संन्यासिनीला राधाबाईनीं आपल्याच बंगल्यांत राहण्याचा आग्रह केला, आणि तिनेंहि मोठ्या आनंदानें ती गोष्ट कबूल केली.

पतीची भेट होईपर्यंत संन्यासिनीचाच वेष धारण करण्याची आमच्या प्रियंवदेनें आपली इच्छा दर्शविली. तिच्या या इच्छेविरुद्ध कोणीहि गेलें नाहीं. रामभाऊंनीं आपल्या बंगाल्यांतील एका स्वतंत्र भागांत तिची राहण्याची व्यवस्था करून दिली. संन्यासिनीच्या वेषाप्रमाणें तिनें आपला उपदेश करण्याचा क्रम येथेंहि सुरू ठेविला. दर रविवारीं स्त्रीसमाज भरवून ती आपल्या रसाळ वाणीनें मंडळीला उपदेश करूं लागली.

दिवसांमागून दिवस आणि महिन्यांमागून महिने भराभर जाऊं लागले, परंतु मनोहरपंतांचा कांहींएक पत्ता लागेना. दिवसेंदिवस प्रियंवदेची काळजी अधिकाधिक वाढूं लागली. तिला कांहींएक सुचेनासें झालें. केवळ त्या सिद्ध पुरुषाच्या वचनाची आजपर्यंतच्या अनुभावावरून तिला खात्री वाटत असल्यामुळेंच, ईश्वरावर भरंवसा ठेवून ती लोकांनां सदुपदेश करण्याच्या कामांत आपल्या दुःसह विरहाचे दिवस कंठूं लागली.

ईश्वर सदा सर्वकाळ कोणालाहि एकाच स्थितींत ठेवीत नाहीं. आज जो सौख्यसागरांत यथेच्छ विहार करीत आहे तो चिरकाल त्याच स्थितींत राहील हें जसें निश्चयानें सांगतां येणार नाहीं, तसेंच आज ज्याला आपण दुःखानें अगदीं गांजलेला पहातों तोहि चिरकाल त्याच स्थितींत राहील याचाहि नियम नाहीं. सुखदुःखांचें हें चक्र एकसारखें फिरत असतें. आज ज्यांनां आपण भाग्यशाली समजतों तेच उद्यां कालचक्राच्या भयंकर फेऱ्यांत सांपडून जमीनदोस्त होऊन जातील! त्याचप्रमाणें आज ज्यांनां कस्पटासमान लेखून ज्यांचा आपण तिरस्कार करितों तेच उद्यां वैभवाच्या अत्युच्च शिखरावर विराजमान झालेले दिसतील. एवंच, या मृत्युलोकांत नित्य ह्मणून कांहीं नाहींच. ज्याच्या त्याच्या पूर्वसंचितानुसार प्रत्येकाला सुखदुःखाच्या स्थितीचा अनुभव घेतल्याविना गत्यंतर नाहीं. पुण्यश्लोक नलराज, महासाधु धर्मराज, पूर्ण प्रतापी श्रीरघुवीर, सत्वशील हरिश्चंद्रप्रभृति महात्म्यांनांहि हा नियम चुकला नाहीं, मग क्षुद्र मानवांचा काय पाड!

प्रकरण चोविसावें.

# संन्यासविसर्जन.

सुदैवानें ह्मणा अगर दुर्दैवानें ह्मणा, गेल्या दोनतीन आठवड्यांपासून राधाबाईचा उजवा डोळा एकसारखा खरूं लागला; हळूहळू तो बरा होण्याच्या ऐवजीं त्यांत एक मोठें फूल पडलें. मोठमोठ्या नामांकित डाक्टरांचीं औषधें झालीं, परंतु गुण ह्मणून लेशमात्र नाहीं. दिवसेंदिवस फूल वाढतच चाललें. औषध देऊन देऊन थकल्यावर डाक्टरांनीं फूल कापून काढण्याची सल्ला दिली. रामभाऊ मोठ्या विचारांत पडले. कारण, शस्त्रप्रयोग केल्यावर तरी खात्रीनें डोळा सुधरेल असें कोणीहि डाक्टर खात्रीपूर्वक सांगेना. अशा स्थितींत डोळ्यावर शस्त्रप्रयोग करण्याचें त्यांनां अमळ कठीणच वाटूं लागलें.

याच संधीस बंगालचे सुप्रसिद्ध वैद्य नित्येंद्रनाथ यांच्या कीर्तीनें मुंबई शहर दुमदुमून गेलें. रामभाऊंच्या कानांवरहि ही गोष्ट साहजिक आली. त्यांनां अर्थातच पैशाचा कांहीं प्रश्न नव्हताच. त्यांनीं लागलाच निश्चय केला, कीं, कितीहि पैसा खर्च होवो, एकदा वैद्यराजांनां घरीं आणून त्यांचें औषध सुरू करावें. या गोष्टीला राधाबाईचा होकार मिळतांच वैद्यराजांनां आणण्याकरितां रामभाऊ स्वतः गाडी घेऊन गेले. अशा लोकोत्तर मनुष्याला पाहण्यासाठीं रामभाऊंच्या बंगल्यावर आज मंडळीची अतोनात गर्दी झाली होती. संन्यासिनीहि तेथें मुद्दाम आली होती. वैद्यराजांची स्वारी आल्यावर त्यांनीं राधाबाईचा डोळा अगदीं

बारकाईनें तपासून पाहिला, आणि "भिण्याचें कांहींएक कारण नाहीं; हें फूल खात्रीनें नाहींसें होऊन डोळा अगदीं साफ बरा होईल!" असें रामभाऊंनां सांगितलें.

कांहीं संशय आल्यावरून ते डोळा पहाण्याच्या निमित्तानें पुनः राधाबाईच्या तोंडाकडे अगदीं बारकाईनें पाहूं लागले. तों त्यांचा संशय अधिकच वाढत चालला. ते रामभाऊंच्या तोंडाकडे पाहूं लागले. आतांतर ते अगदींच विस्मयांत पडल्यासारखे दिसले. त्यांची वृत्ति चंचल झाली. आपण काय करितों, किंवा काय बोलतों, याचें त्यांनां भानहि राहिलें नाहीं. तेथून लवकर निघून जावें, असा विचार करून ते रामभाऊंनां ह्मणाले "बरें, आतां मी जातों. कोणीतरी बरोबर द्या ह्मणजे औषध देईन, तें डोळ्यांत घालीत जा. उद्यांपासूनच गुण येण्याला सुरुवात होईल."

वैद्यराजांची ही साशंक वृत्ति पाहून रामभाऊ विस्मित होऊन गेले. त्यांनां याचें कारण कांहींएक कळेना. वैद्यराज परत जाण्यासाठीं उठले. रामभाऊंनीं त्यांनां थोडा वेळ दिवाणखान्यांत बसण्याचा आग्रह केला. अगदींच वाईट दिसेल ह्मणून मोठ्या कष्टानें वैद्यराजांची स्वारी उगाच पांच मिनिटें बसली. या वेळीं घरांतील सर्व मंडळी तेथें जमली होती. वैद्यकीसंबंधीं रामभाऊंजवळ गोष्टी बोलतांबोलतां वैद्यराजांनीं सहज तोंड वर करून मंडळीकडे पाहिलें. कर्मधर्मसंयोगानें संन्यासिनीहि याच वेळीं वैद्यराजांकडे पहात होती. तिची आणि यांची दृष्टादृष्ट झाली. त्याबरोबर दोघांचीहि स्थिति कांहीं विलक्षण झाली! संन्यासिनी कांहीं फार दिवसांच्या गोष्टीचें स्मरण करीत आहेशी दिसली. वैद्यराजांची गोष्ट तर कांहीं विचारूच नका! त्यांनां संशयराहूनें

पक्केंच घेरलें. ते उठले व मी उद्यां परत येईन असें ह्मणून गाडींत बसून फी वगैरेची अपेक्षा न करितां चालते झाले.

इकडे संन्यासिनीचीहि तीच स्थिति झाली. मन किंचित् स्वस्थ झाल्यानंतर तिनें आपले दीर गणपतराव यांनां आपल्यास आलेला संशय शांतपणानें सांगितला. तें ऐकण्याचीच खोटी, गणपतरावांनांहि तसेंच वाटूं लागलें. त्यांनीं ही गोष्ट रामभाऊंजवळ काढिली. त्याबरोबर रामभाऊंच्या मनानेंहि तेंच घेतलें. राधाबाईहि तसेंच कांहीं ह्मणूं लागल्या. रामभाऊ ह्मणाले "आतां माझ्या ध्यानांत आलें, वैद्यराज इतक्या बारकाईनें पुनपुनः हिच्या तोंडाकडे कां निरखून पहात होते तें! हो हो, हें असेंच असलें पाहिजे. एरव्हीं त्यांची वृत्ति अशी एकदम बदलल्यासारखी कां झाली असती? त्यांची मुद्रा अशी साशंक कां दिसती? अहाहा! हें खरें असल्यास केवढा आनंदाचा दिवस हा! काय हा विलक्षण योगायोग तरी! परमेश्वरा, तुझी लीला अगाध आहे!"

हां हां ह्मणतां ही गोष्ट घरभर झाली. सर्वांनीं उद्यां वैद्यराज येतांच आपल्यास आलेल्या आनंददायक संशयाचें निराकरण करून घ्यावयाचें, असा निश्चय केला. सगळ्यांचीं मुखें आनंदानें फुलल्यासारखीं दिसूं लागलीं. गणपतराव तर ह्मणूं लागले "आपण आत्तांच्या आत्तांच या गोष्टीचा शहानिशा करून येतों."

"आजच्या एकाच दिवसानें काय होतें आहे? ते आज शंकेनें फारच अस्वस्थ झाल्यासारखे दिसत होते. तरी आजचा दिवस त्यांचें मन स्वस्थ होऊंद्या." असें ह्मणून रामभाऊंनीं गणपतरावांचें निवारण केलें.

दुसऱ्या दिवशीं मोठ्या सकाळींच वैद्यराज गंभीर आणि शांत मुद्रेनें रामभाऊंच्या बंगल्यावर आले. त्यांनीं राधाबाईचा डोळा तपासून पाहिला. फूल खरोखरच झरण्यास सुरुवात झाली होती. तें पाहून त्यांनां समाधान झाल्यासारखें दिसलें. पुनः औषधाबद्दल वगैरे खुलासा करून ते जाण्यासाठीं उठले. रामभाऊ या वेळीं बरोबरच होते. त्यांनीं मोठ्या आग्रहानें त्यांनां पुनः थोडा वेळ बसण्याची विनंति केली. काय असेल तें असो, तेथें बसल्यावर वैद्यराजांनां आज तेथून लवकर उठावेंसेंच वाटेना. इतक्यांत रामभाऊ मोठ्या आदरानें ह्मणाले "वैद्यराज! आपल्याला राग येणार नाहीं, तर विचारतों. आपण बंगाल्यांतील आहां खरे, तरी आपल्यावर आमच्या या प्रांताची किंचित् झांक मारतेशी दिसते. याचें कारण काय असावें बरें?"

आतां यावर काय उत्तर येतें तें ऐकण्याला एकंदर मंडळी अगदीं आतुर होऊन वैद्यराजांच्या मुखाकडे एकाग्र दृष्टीनें पाहूं लागली. वैद्यराज थोडा वेळ मोठ्या घोटाळ्यांत पडले. त्यांनीं या सर्व मंडळीला ओळखलें असावेंसें दिसे; परंतु कदाचित् आपल्या समजुतींत कांहीं चूक झाल्यास निष्कारण उपहास होईल, या विचारानें त्यांनां ग्रासून टाकिलें. ते ह्मणाले "आपला तर्क बरोबर आहे. बंगालप्रांत कांहीं माझी जन्मभूमि नव्हे. आपल्याला व त्याचप्रमाणें या सर्व मंडळीला मीं कुठेंसें पाहिल्याचा भास होतो, परंतु नक्की कांहीं आठवत नाहीं."

इतक्यांत संन्यासिनी निमित्त करून वैद्यराज आणि रामभाऊ बसले होते त्यांच्या मागल्या बाजूला गेली व वैद्यराजांच्या उजव्या कानाकडे हळूच पाहूं लागली. मनोहरपंतांच्या उजव्या कानाखालीं

एक तीळ होता. तो वैद्यराजांच्या कानाखालींहि आहे असें पहातांच तर तिची पक्की खात्री झाली. ती समयोचित विनयानें ह्मणाली "मनुष्य जेव्हां बुध्द्या निजल्याचें सोंग घेतो, तेव्हां त्याला उठविण्याकरितां लोकांनीं कितीहि हांका मारिल्या, तरी त्या त्याला ऐकूं जात नाहींत. माझ्या या अमर्यादपणाबद्दल क्षमा असावी."

वैद्यराज ह्मणाले "खरोखर, ईश्वरसाक्ष सांगतों, मी ढोंग करीत नाहीं. माझें मन अगदीं पराकाष्ठेच्या घोटाळ्यांत पडलें आहे. माझ्या मनांत जी शंका आली आहे ती खरीच असेल कीं काय, याचा मी विचार करीत आहें."

रामभाऊंचीहि आतां अगदीं खात्री झाली. त्यांनीं एकदम मोठ्या प्रेमानें वैद्यराजांनां घट्ट मिठी मारिली आणि सद्गदित स्वरानें ह्मटलें "संशय नकोच, मनोहरपंत!"

वैद्यराजांनां आतां अनावर गहिंवर आला. त्यांच्या तोंडांतून शब्द निघेना. डोळ्यांतून आनंदाश्रूंचा प्रवाह सुरू झाला. ते मोठ्या कष्टानें "रामभाऊ!" इतकेंच ह्मणून स्तब्ध राहिले.

रामभाऊ ह्मणाले "हे आपले कनिष्ठ बंधु गणपतराव, आणि ही त्यांची पत्नी लक्ष्मीबाई."

मनोहरपंतांनीं आपल्या कनिष्ठ बंधूला कडकडून आलिंगन दिलें. इतक्यांत आमची प्रियंवदा आपल्या संन्यासिनीच्या वेषाचें विसर्जन करून साधाच पण नीटनेटका पोषाख करून बाहेर आली. तिनें येतांच पतीच्या चरणांवर मस्तक ठेविलें व आनंदाश्रूंनीं त्यांनां स्नान घातलें. आणि "आपली नम्र दासी आणि हा आपला प्रियपुत्र मधुकर," असें ह्मणून तिनें मुलाला मनोहरपंतांच्या पायांवर घातला.

मुलाला हृदयाशीं घट्ट कवटाळून धरून आमचे मनोहरपंत पुत्रसुखाचा अनुभव घेण्यांत गर्क झाले. सर्व मंडळी आनंदसागरांत पोहूं लागली. त्या आनंदाचें वर्णन करणें अशक्य आहे. स्वर्गसुख ह्मणून जें कांहीं ह्मणतात, त्याचा अनुभव आज आमची प्रियंवदा आपल्या पतिपुत्रांसह अनुभवीत होती. आजचा दिवस कांहीं अकल्पित आनंदाचा होता! त्या भयंकर समुद्रांत ताटातूट झालेल्या बहुतेक मंडळीची आज बारा वर्षांनीं पुनः अशा विलक्षण रीतीनें एकदम भेट व्हावयाची होती. कुसुमकुमारीहि तेथेंच होती. तिची ओळख करून देतांना मंडळीला माधवराव आणि रमाबाई यांची आठवण झाली व अशा अत्यानंदाच्या प्रसंगीं त्यांच्यासंबंधीं यत्किंचितहि बातमी न लागल्यामुळें सर्वांनां अतिशय दुःख झालें.

पूर्वीं ठरल्याप्रमाणें त्या दिवशीं भोजनोत्तर मंडळी दिवाणखान्यांत जमल्यावर मनोहरपंतांनीं आपला प्राण कसा वांचला, ती हृदयद्रावक हकीगत सविस्तरपणें सांगितली. सर्व मंडळी उत्सुकतेनें ऐकत होती. मनोहरपंत ह्मणाले "या जगांत पैसा ही मोठी अजब चीज आहे. आगबोट आतां बुडणार असें पहातांच मी बोटीवरील लोक मागतील त्या रकमा कबूल केल्या व झपाझप सर्वांची बरीवाईट सोई त्यांच्याकडून लावून घेतली. शेवटीं एखादी फळी स्वतःसाठीं घेऊन निघणार, तोंच भयंकर गर्जना झाली. तो प्रसंग आठवला ह्मणजे अझूनहि अंगावर कांटा उभा रहातो. पुढलें मला कांहीं ठाऊक नाहीं. माझे प्राण कोणीं कसे वांचविले तें त्या जगन्नियंत्याला ठाऊक! मी अत्यवस्थस्थितींत एका हास्पिटलांत शुद्धीवर आलों. तेथें अनेक शारीरिक आणि मानसिक दुःखें भोगून कांहीं महिन्यांनीं एकदाचा बाहेर पडलों. भयंकर समुद्राच्या

एकाच लाटेसरशी आपली प्रेमळ पत्नी, सद्गुणी मुलगा आणि सुशील मित्र यांचा अशा रीतीनें संहार व्हावा, हा ईश्वराचा माझ्यावर केवढा कोप! खरोखर मीं पूर्वजन्मीं कोणतेंतरी अघोर पातक केलें असावें आणि ह्मणूनच या खडतर शिक्षेस पात्र झालों आहें. त्या पापाचें क्षालन देह कष्टवून करावें, असा मीं निश्चय केला व तीर्थयात्रा करीत गांवोगांव भटकूं लागलों. शिवाय, मीं मनामध्यें असा विचार केला, कीं, ज्या जागीं आपण आजपर्यंतचे दिवस मोठ्या आनदांत आणि सौख्यांत घालविले, त्या जागीं आतां हें अपयश डोक्यावर घेऊन जाण्यांत काय अर्थ आहे? आणि आतां तेथें जाऊन तरी काय करावयाचें आहे? तेथें गेलों काय आणि कुठेंहि राहिलों काय सारखेंच! ह्मणून जिकडे वाट फुटेल तिकडे भ्रमण करूं लागलों. लवकरच मी बैराग्यांच्या एका टोळींत सामील झालों व त्यांच्याबरोबर भटकूं लागलों. जेथें जेथें जाई तेथें तेथें आपल्या मंडळीपैकीं कोणी दैववशात् भेटल्यास पहावें ह्मणून मीं अगदीं बारकाईनें तपास करीं व कांहींएक पत्ता लागला नाहीं ह्मणजे अगदीं निराश होई.

"परंतु या प्रवासापासून मला एक मात्र फायदा झाला. जगाचा पुष्कळ प्रकारचा अनुभव मिळवितां आला. निरनिराळ्या माणसांशीं संबंध पडल्याकारणानें, मनुष्यस्वभावाची अगदीं सूक्ष्म तऱ्हेची पारख करितां येऊं लागली. असेंच भटकतां भटकतां एक दिवस माझी एका अवलियाशीं गांठ पडली. त्या अवलियानें कांहीं एका चमत्कारिक वनस्पतीच्या योगानें माझा फार दिवसांचा शत्रु जो अर्धांगवायु त्याच्या त्रासांतून मला अत्यल्प काळांत मुक्त केलें. त्या अद्वितीय वनस्पतीचा हा प्रभाव पाहून मला ईश्वरी कर्तृत्वाचें

मोठें कौतुक वाटलें. मीं त्या अवलियाची एकनिष्ठपणें सेवा करण्याला सुरुवात केली. पुढें माझ्यावर त्याची मर्जी बसून त्यानें आपल्या जवळील गुप्त औषधी हळूहळू मला दाखविल्या. मीं त्यांचें अल्प काळांत उत्तम ज्ञान संपादन केलें, आणि त्या अवलियाच्या सांगण्यावरून हकीम हें नांव धारण केलें. पांचसहा वर्षे त्या अवलियाच्या सहवासांत घालविल्यामुळें मला या हकीमीच्या धंद्याचा उत्तम अनुभव मिळवितां आला. पुढें त्या अवलियाबरोबर भटकत भटकत मी बंगाल्यांत येऊन पोंचलों. येथें आल्यावर मीं आपला मूळचा वेष सोडून बंगाली बाबूसारखा पोषाख करूं लागलों. दाढी लांब वाढविली आणि मस्तकावरील केशहि तिकडील रिवाजाप्रमाणेंच ठेविले. आपलें नांव बदलून मी आतां आपणास कविराज नित्येंद्रनाथ ह्मणवूं लागलों. अलौकिक औषधींच्या साह्यानें हळुहळू माझें प्रस्थ बरेंच वाढलें. दूरदूरच्या गांवांहून मला आमंत्रणें येऊं लागलीं. पैशांच्या राशी पडूं लागल्या. चंद्रनगरचे डेप्युटी कलेक्टर बाबु शशिभूषण मुकरजी यांचा फारा दिवसांचा कुष्ठरोग बरा होतांच बंगाल्यांतील सर्व वर्तमानपत्रांनीं माझ्या अलौकिक सामर्थ्याबद्दल फारच प्रशंसा केली.

“ मुंबईंत मोतीबाजारांत रमेशचंद्र बोस ह्मणून एक धनाढ्य बाबू जवाहिराचा व्यापार करीत असतो. त्याचा मूळ गांव चंद्रनगर. मुंबईंत सुदैवानें त्याच्या व्यापाराचें चांगलेंच जमलें असल्यामुळें त्यानें हल्लीं मुंबईसच आपलें कायमचें ठाणें दिलें आहे. त्याची आणि बाबू शशिभूषण मुकरजी यांची फार मैत्री आहे. रमेशबाबूंला फार दिवसांपासून मधुमेहाच्या विकारानें पछाडलें होतें. त्यांनीं आजवर हजारों रुपये खर्चून पुष्कळ इंग्रज आणि अमेरिकन

डाक्टरांची औषधें घेतलीं; परंतु तो रोग कांहींकेल्या त्यांची पाठ सोडीना. उलट दिवसेंदिवस बळावत चालला होता. रमेशबाबूंनीं आपल्या जगण्याची आशा अगदीं सोडून दिली होती. इतक्यांत बंगल्यांतील वर्तमानपत्रांत त्यांचे मित्र बाबू शशिभूषण मुकरजी यांचें फार दिवसांचें कुष्ठ एका कविराजानें अत्यल्प काळांत बरें केलें, ही हकीगत त्यांच्या वाचनांत आली. हे कविराज दुसऱ्या अनेक असाध्य रोगांवरहि औषध देत असतात आणि त्यापासून शेकडों लोकांस गुण येत आहे, वगैरे स्तुति अनेक वर्तमानपत्रांत वाचून रमेशबाबूंला आपणहि एकदा या कविराजांचा अनुभव घ्यावा, अशी साहजिक इच्छा उत्पन्न झाली. त्यांनीं ताबडतोब तत्संबंधीं खुलासेवार माहिती आपले मित्र बाबू शशिभूषण यांजकडून पत्रद्वारें मागविली. शशिभूषण बाबूंनीं मला भेटून पुढील मजकुराचें उत्तर पाठविलें. "कविराज नित्येंद्रनाथ यांच्यासंबंधीं आपण वाचलेली सर्व हकीगत खरी आहे. माझें कुष्ट त्यांनीं खरोखरच अगदीं थोडक्या दिवसांत साफ बरें केलें. त्याचप्रमाणें दुसऱ्या कैक लोकांनां त्यांनीं अगदीं असाध्य रोगांच्या तावडींतून सोडविलें आहे. त्यांच्याजवळील औषधींचा प्रभाव कांहीं अद्वितीय आहे. आपण इकडे आल्यास आपला रोग खात्रीनें बरा करण्याची ते हमी घेत आहेत. तरी पत्रदेखत महिना पंधरा दिवसांकरितां निघून यावें." पत्रांतील मजकूर वाचून रमेशबाबूंला बरेंच समाधान वाटलें. परंतु मुंबईहून चंद्रनगराला जाण्याची ताकद त्यांच्या त्या रोगग्रस्त शरीरांत राहिली नव्हती, ह्मणून त्यांनीं ताबडतोब मुकरजींला तार पाठविली, कीं, " येईल तो खर्च

करण्याला मी तयार आहें, तरी कविराजांनां घेऊन आपण तावड-तोब इकडेसच यावें."

मुकरजी बाबूंच्या आग्रहावरून मी इकडे आलों. रमेशबाबूंला औषध सुरू झालें, आणि ईश्वराच्या कृपेनें, हां हां ह्मणतां त्यांचा तो फारा दिवसांचा अंगांत मुरलेला रोग हटत जाऊन अल्पकाळांतच पार नाहींसाहि झाला. बाबूसाहेब फारच खुष झाले. त्यांनीं ठरावाच्या दुप्पट पैसे मला दिले. रमेशबाबूंचा असाध्य रोग बंगाल्यांतील एका वैद्यराजानें बरा केला, ही बातमी हां हां ह्मणतां सर्व मुंबईभर पसरली व कोड, पक्षघात, मधुमेह, क्षय, उदर वगैरे असाध्य रोगांच्या माणसांच्या झुंडीच्या झुंडी माझ्या बंगल्यावर जमूं लागल्या. बंगाल्यापेक्षांहि मुंबईंत प्राप्ति उत्तम होऊं लागली. आज परत जाऊं, उद्यां जाऊं, करतां करतां महिना गेला, दीड महिना गेला, तरी बंगाल्यांत जाण्याला दिवस वांटणीस येईना. शेवटीं पुष्कळ लोकांच्या आग्रहावरून मीं आपला बंगाल्यांतील दवाखाना एका मनुष्याच्या हवालीं करून मुंबईसच एक नवीन 'रुग्णचिकित्सालय' स्थापन केलें. जमल्यास चारसहा महिन्यांनीं बंगाल्यांत एखादी फेरी मारून यावें, असा विचार केला आहे."

प्रकरण पंचविसावें.

## उपसंहार.

आमच्या मनोहरपंतांनीं हलीं गिरगांवांत एक प्रशस्त बंगला घेऊन तेथें आपलें रुग्णचिकित्सालय आणलें होतें. चारसहा महिन्यांनीं बंगाल्यांत एखादी फेरी मारून यावें, असा त्यांचा प्रारंभीं मानस होता खरा, परंतु मुंबईतील त्याचप्रमाणें दूरदूरच्या शहरांतून येणाऱ्या रोग्यांच्या गर्दीमुळें त्यांनां एका क्षणाचीहि फुरसत सांपडेना. सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्यांच्या बंगाल्यावर रोग्यांची दाटी असे. त्यांनीं आपलें नांव वैद्यराज नित्येंद्रनाथ हेंच चालू ठेविलें होतें व त्या नांवानेंच त्यांची कीर्ति दूरदूरच्या शहरीं पसरली होती.

एके दिवशीं एक श्रीमान् गुजराथी गृहस्थ आपल्याबरोबर एक रोगी घेऊन वैद्यराजांच्या बंगल्यावर आला. या रोग्याच्या पायाला कांहीं विकार झाला होता. पाय बारकाईनें पाहून वैद्यराजांनीं ह्मटलें "रोग तर पुष्कळ दिवसांचा दिसतो ?"

गुजराथी गृहस्थानें सांगितलें "होय, आज आठदहा वर्षें झालीं."

"मग इतके दिवस औषधोपचार कां केले नाहींत ?"

या रोग्याबरोबर त्याची बायकोहि आली होती. ती डोळ्यांत पाणी आणून ह्मणाली "वैद्यराज, ती सर्व कर्मकथा सांगूं गेल्यास आपल्याच्यानं ऐकवणारसुद्धां नाहीं! बारीकसारीक उपाय पुष्कळ करून पाहिले, परंतु त्यांचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. आतां या दयाळशेटजींनीं फारच आग्रह केल्यावरून आह्मी मुंबईस आलों आहों. बाहेरगांवीं वैद्याकडे किंवा डाक्टराकडे जाण्याची

मनांत कल्पना आली ह्मणजे अंतःकरणांत धस्स होतं व आमच्यावर कोसळलेल्या एका दुर्धर प्रसंगाची आठवण होते—"

ह्या रोग्याला पहातांक्षणींच मनोहरपंत मोठ्या संशयांत पडले होते. ह्या रोग्याला आपण कोठेंतरी पाहिला असावा, असें त्यांचें मन त्यांना सांगत होतें. परंतु बोलूनचालून गुजराथी गृहस्थ, त्याची आपली ओळख असणें त्यांना संभवनीय वाटेना. ते त्याच्याशीं गुजराथींतच बोलत होते. रोगीहि गुजराथींतच उत्तर देत होता. परंतु रोग्याची बायको उत्तर देतांना जरी गुजराथींतच बोलत होती तथापि मधूनमधून एखाददुसरा मराठी शब्द चुकून तिच्या तोंडून निघतांना पाहून, त्याचप्रमाणें तिच्या पोषाखांतहि दक्षिणी तऱ्हेचीच जास्त झांक पाहून, मनोहरपंत विस्मयांत पडले. पुढें तिनें जी थोडीशी आपली हकीगत सांगितली, तिच्यावरून तर त्यांचा संशय अधिकच वाढला. ह्मणून ते उत्सुकतेनें ह्मणाले "बाई, रोगाचें कारण बरोबर लक्ष्यांत येण्यासाठीं रोग्याची मानसिक, शारीरिक एकंदर हकीगत कळणें आवश्यक आहे. यासाठीं आपण कसलाहि आडपडदा न ठेवितां जर आपली एकंदर हकीगत सांगाल तर औषधयोजना करण्यास ठीक पडेल."

"आमच्या दुर्दैवाची हकीगत ऐकण्याचा आपला आग्रह असल्यास सांगणें भाग आहे!" असें ह्मणून तिनें आगबोट फुटण्या-पर्यंतची सविस्तर हकीगत वैद्यराजांस सांगून पुढें ती ह्मणाली "याप्रमाणं एका लांकडी फळीच्या आधारानं वहात वहात आम्ही नर्मदेच्या मुखाजवळील एका गांवीं सुरक्षित पोहोंचलों. आमच्या बरोबरची सर्व मंडळी समुद्रांत बुडाल्यामुळं आह्मांला जें दुःख झालं—आणि त्याची आठवण झाली ह्मणजे अझूनहि प्रतिक्षणीं

आमच्या अंतःकरणाला ज्या असह्य वेदना होत असतात, त्या एका नारायणालाच ठाऊक! आमची ती विपन्न स्थिति पाहून या दयाळशेटजींस आमची करुणा आली व यांनीं आह्मांला आश्रय दिला. यांच्या घरीं कांहीं दिवस राहिल्यावर पुढं गांवीं जावं, असा विचार होता. परंतु दयाळशेटजींनीं 'जाल जाल' असं ह्मणून आह्मांला बरेच दिवस आपल्या घरीं ठेवून घेतलं व पुढं तर जाऊंच दिलं नाहीं. आपल्या इथंच आह्मीं दोघांनींहि नेहमीं रहावं, असा आग्रह धरून बसले. इकडेहि वाटलं, कीं, आतां दुसरीकडे जाऊन तरी काय करायचं आहे? आणि जगांत आतां आपलं आहे तरी कोण? जे दयाळशेटजी आमच्यावर जीवप्राण करतात तेच आतां आपले आप्त समजले पाहिजेत, व हाच आपला गांव ह्मटला पाहिजे. मलाहि हा विचार मान्य झाला व आह्मी यांच्याच घरीं राहिलों. पुढं कांहीं वर्षांनीं दयाळशेटजींची परवानगी घेऊन आह्मीं तीर्थयात्रेला जाण्याचा विचार केला. हेतु हा कीं, आमच्या बरोबरच्या मंडळीपैकीं आमच्याचप्रमाणं सुदैवानं कोणी जिवंत जमिनीस लागल्यास त्यांचा शोध करावा. आह्मी सुरक्षितपणं किनाऱ्यास लागलों हें वर्तमान आह्मीं आजवर दुसऱ्या कोणाला कळविलं नाहीं. कारण, घरीं आमच्यासाठीं दुःख करण्याजोगं कोणीहि नव्हतं. जें दुःख भोगण्याचं दैवीं आलं आहे तें परमेश्वरावर भरंवसा ठेवून भोगीत आहों. ठरल्याप्रमाणं तीर्थयात्रेला आतां महिन्यापंधरा दिवसांत निघायचं असा आह्मीं नक्की बेत केला होता, इतक्यांत मधेंच एक नवीनच विघ्न उपस्थित झालं. इकडच्या पायाला गुडघीसारखा चमत्कारिक रोग झाला व घराबाहेर हिंडतांफिरतांहि येईना. बाकीच्या मंडळीच्या शोधाची

थोडीशी खटपट केली असती, तीहि आशा आतां खुंटली. असें पाहून निराश होऊन दैवावर हवाला ठेवून स्वस्थ राहिलों. गेल्या दोनतीन महिन्यांपासून आपली कीर्ति कानीं आली, तेव्हां एकदा आपल्याला भेटून नशिबाची परीक्षा पहावी, असं मीं सांगितलं. परंतु जें काय परमेश्वराच्या मनांत असेल तें इथल्या इथेंच होऊंदे, आपण मुंबईस जाणार नाहीं, असं ह्मणूं लागले. परंतु या दयाळू दयाळशेटजींनीं कशीबशी समजूत घालून आपल्या पायांपाशीं आणलं आहे. त्या ईश्वराला करुणा येऊन आमच्या दैवांतील भोग संपले असल्यास आपल्या हातास यश येईल." असें ह्मणून बाईनें वैद्यराजांच्या पायांवर डोकें ठेवून ती स्फुंदूं लागली.

आमच्या मनोहरपंतांचेंहि अंतःकरण भरून आलें. त्यांचा सर्व संशय फिटून आपल्याकडे आलेले रोगी कोण आहेत हें त्यांनीं ओळखलें. " बाई, अमळ बसा, मी आंतून औषध घेऊन येतों. हा रोग खात्रीनें बरा होईल. तुह्मी मुळींच काळजी करूं नका." असें सांगून ते घरांत गेले व आपल्या पत्नीस तें आनंदवृत्त कळवून कांहीं वेळानें बाहेर आले. नंतर त्यांनीं एका पातळ औषधाचा रोग्याच्या पायाला लेप लाविला व त्याला अमळ स्वस्थ पडावयास सांगून बाईस ह्मणाले " बाई, तें पहा आंत आपल्यास कोणी बोलवीत आहे !"

रमाबाई चकित मुद्रेनें आंत गेल्या मात्र, तोंच प्रियंवदेनें त्यांनां प्रेमालिंगन देऊन सद्गदित स्वरानें ह्मटलें "रमाबाई, तुमच्यावर हें घोर संकट आणून तुमच्या प्रिय कन्येची ताटातूट करण्यास कारण झालेल्या या तुमच्या अपराधी मैत्रिणीला नाहीं का तुह्मी ओळखलंत ?"

रमाबाईला तावडतोब ओळख पटली, हें कांहीं निराळें सांगावयास नकोच! इकडे बाहेर दिवाणखान्यांतहि हाच प्रकार चालला होता. सर्वत्र आनंदीआनंद झाला! कुसुमकुमारीची आणि तिच्या आईची भेट झाली. सर्व खुलासा झाला. मंडळीच्या आनंदास पारावार राहिला नाहीं!



## मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांपैकीं कांहीं निवडक पुस्तकें, विक्रीस तयार.

**१ नशिबाची परीक्षा**. लेखक—प. वा. श्रीयुत विष्णु विनायक साठ्ये. 'इथेंच करावें, इथेंच भरावें' नी, चांगल्याचा परिणाम शेवटीं चांगलाच होऊन दुसऱ्यासाठीं खाडा खोदणारांनां अखेर स्वतःच त्या खाड्यांत पडावें लागतें, हें फारच सुंदर रीतीनें या कादंबरींत दाखविलें आहे. कथाभागास अनुसरून सहासात सुंदर चित्रेंहि दिलीं आहेत. **किंमत. १-४-०.**

**२ माणिकबाग**. लेखक—श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे, बी. ए. शुद्ध वर्तनाच्या आणि निष्कपट अंतःकरणाच्या परंतु संशय आणि त्या संशयामुळें उत्पन्न झालेला मत्सर यांनीं ग्रासलेल्या एका हतभागी स्त्रीनें अविचाराच्या भरीं पडून भलतीच गोष्ट करून आपल्या एकंदर जन्माचें कसें मातेरें करून घेतलें, त्याचें हृदयद्रावक चित्र या कादंबरींत रेखाटलें आहे. **किंमत** साधी बांधणी १-४-०. कापडी बांधणी १-८-०.

**३ दुःखाअंतीं सुख**. लेखक—श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे, बी. ए. ' जिच्या हातीं पाळण्याची दोरी तीच देशाला उद्धरी !' चांगली माता कितीहि गरीबी, संकटें, दुर्धर प्रसंग आले तरी त्यांतून पार पडून आपल्या मुलांनां कशी सन्मार्गवर्ती बनविते; आपल्या मुलांचें भाग्य कसें उदयास आणिते; तसेंच अप्रबुद्ध, मूर्ख आई आपल्या मुलांच्या जन्माचें कसें मातेरें करते, याचें हुबेहुब चित्र या कादंबरींत दिसेल. **किंमत. १-४-०.**

**४ दोन घटका मनोरंजन**. (भाग १ ला.) मनोरंजनच्या १ ल्या, २ ऱ्या, आणि ३ ऱ्या ह्या तीन्ही पुस्तकांतील निवडक गोष्टी यांत आहेत. **किंमत** १-४-०.

**५ दोन घटका मनोरंजन**. (भाग २ रा.) मनोरंजनच्या ४ थ्या, ५ व्या, आणि ६ व्या या तीन पुस्तकांतील निवडक गोष्टी ह्यांत आहेत. **किंमत. १-४-०.**

**६ संसाररंजन**. मनोरंजनच्या ९ व्या आणि १० व्या या दोन वर्षांच्या पुस्तकांतील निवडक गोष्टी यांत आहेत. **किंमत** १-०-०.

**७ लीला**. लेखक—श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र. भाऊबंदकीनें घरादाराचें वाटोळें होऊन खोट्याच्या कपाळीं गोटा कसा पडतो त्याचें चित्तवेधक चित्र यांत आहे. यांत ७-८ सुंदर चित्रेंहि आहेत. **किंमत** ०-१२-०.

**८ नवयुग**. लेखक—श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे, बी. ए. पूर्व आणि पश्चिम यांचा संयोग होऊन आपल्या देशांत आचारविचारांत क्रांति घडवून आणणाऱ्या **नवयुगाचें** यांत वर्णन आहे. **किंमत** ०–१२–०.

**९ जीवनसंध्या**. लेखक—श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर. भारतभूषण क्षत्रियकुलावतंस महाराणा प्रतापसिंहानें केवळ स्वातंत्र्यासाठीं दिल्लीश्वर अकबर बादशहाशीं आमरण युद्धप्रसंग करून प्रगट केलेलें असामान्य क्षात्रतेज, भोगलेली दुर्धर विपत्ति, विलक्षण आत्मत्याग; त्याचप्रमाणें क्षत्रियकुमार तेजसिंहाचा धीरोदात्त स्वभाव, देवकन्या पुष्पकुमारीचें सच्चरित्र, भिल्लबाला गिरिजेचें चातुर्य आणि सतीत्व वगैरे अनेक प्रसंग फारच बहारीचे आहेत. **किंमत** ०।१२.

**१० राजा तोडरमल**. लेखक—' शांताराम. ' भारतभूषण महाराजा तोडरमल यांच्या वेळच्या समाजस्थितीचें ह्या कादंबरींत सुंदर चित्र आहे. नरेंद्रनाथाचें लोकोत्तर वीरत्व, सरलेचें विशुद्ध प्रेम, महाश्वेतेची कठोर प्रतिज्ञा, शकुनीचें भयंकर कपट, विमलेचा देवस्वभाव, अमला व कमला यांचें निष्काम प्रेम, नगेंद्रनाथाचा पश्चात्ताप ह्यांचें ह्यांत हृदयद्रावक वर्णन आहे. **किंमत** साधी बांधणी ०–१२–०. कापडी बांधणी ०–१४–०.

**११ गृहशिक्षण**. लेखक—प. वा. श्रीयुत शंकर रामचंद्र हतवळणे. मुलांनां जन्म देऊन मातेची पदवी पटकावणाऱ्या पुष्कळ आहेत. मुलांनां सुशिक्षण देईल तीच खरी माता होय ! या पुस्तकाचा मातांनां फारच चांगला उपयोग होईल. **किंमत** ०–१२–०.

**१२ सुशिक्षित स्त्री**. लेखक—प. वा. श्रीयुत शंकर रामचंद्र हतवळणे. नांवावरूनच यांत काय आहे हें कळेल. प्रत्येक सुशिक्षित स्त्रीच्या संग्रहीं हें पुस्तक अवश्य असावें. **किंमत** ०–१०–०.

**१३ सरस्वती**. लेखक—प. वा. श्रीयुत बाळकृष्ण रामचंद्र कुळकर्णी. दुसऱ्याचें कल्याण चिंतिल्याचा शेवटीं किती गोड परिणाम होतो, आणि दुसऱ्याच्या घातपाताची इच्छा करणारांची शेवटीं कशी दुर्दशा होत असते, ह्याचा, ही कादंबरीवाचकांच्या मनावर चांगलाच ठसा उमटवील. **किंमत** ०–१०–०.

**१४ भद्रंभद्र**. लेखक—श्रीयुत बापुराव करंदीकर. सारासार विचार न करितां ' जुनें तें सोनें ' मानणाऱ्या पुराणप्रिय मंडळीकडून पदोपदीं कसे

हास्यास्पद प्रकार घडत असतात, त्याचें फारच बहारीचें वर्णन यांत आहे. **किंमत ०-१०-०.**

**१५ धाकट्या सूनबाई.** लेखक—श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र. ही उपदेशपूर्ण अत्यंत मनोवेधक सुरस कादंबरी दरएक सुनेकडून, दरएक तरुण मुलीकडून अवश्य वाचवावी. **किंमत** ०-८-०.

**१६ मृणालिनी.** लेखक—श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र. या कादंबरीचें कथानक इतकें रमणीय, मोहक व चित्तवेधक आहे, कीं, पुस्तक एकवार हातांत घेतल्यावर तें संपूर्ण वाचल्याशिवाय वाचकास स्वस्थता वाटत नाहीं. **किंमत.** साधी बांधणी ०-८-०. कापडी बांधणी ०-१०-०.

**१७ परिणामीं हेंच.** लेखक—प. वा. श्रीयुत बाळकृष्ण रामचंद्र कुळकर्णी. मूलबाळ असतांहि प्रथम पत्नी निवर्ततांच द्वितीय संबंध करणाराच्या गृहस्थितीचें, त्याचप्रमाणें सापत्नभावाचें, कुटुंबक्लेशाचें वगैरे यांत वर्णन आहे. **किंमत ०-८-०.**

**१८ मूर्तिमंत देशाभिमान.** लेखक—श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे, बी. ए. राजाराम महाराजांच्या कारकीर्दीचे वेळीं मराठी राज्याची आणि समाजाची स्थिति कशी होती, त्याचें चित्र यांत रेखाटलें आहे. **किंमत ०-८-०.**

**१९ विलक्षण भोळेपणा.** लेखक—श्रीयुत वासुदेव गोविंद आपटे, बी. ए. ही एक हास्यरसोत्पादक मौजेची कादंबरी आहे. भोळ्या बाळूची प्रत्येक कृति वाचकांस पोट धरधरून हंसवील. **किंमत.** ०-८-०

**२० संसारांतल्या गोष्टी.** लेखक—श्रीमती सौ० काशीबाई हेरलेकर. प्रौढ मुलींनां आणि तरुण स्त्रियांनां ह्या पुस्तकांतल्या गोष्टी गमतीच्या वाटतील. स्वयंपाकाची माहिती, आरोग्यरक्षणाचे नियम, गृहकृत्यांची व्यवस्था, जमाखर्चाचा हिशोब वगैरे संसारोपयोगी अनेक विषयांचें ह्यांत गोष्टींच्या रूपानें सुंदर विवेचन केलें आहे. **किंमत** ०-६-०.

**२१ अमृतपुलिन.** लेखक—श्रीयुत सहस्रबुद्धे. यांतील राजकन्या हिरण्मयी आणि राजकुमार अजयसिंह ह्या प्रणयीयुगुलाच्या दुष्ट दैवानें केलेल्या भयंकर छलाचें वर्णन वाचून केवढाहि कठोरहृदयी वाचक असो, त्याचें अंतःकरण भरून आल्याशिवाय रहाणार नाहीं ! कोमल अंतःकरणाच्या वाचकाला कदाचित् एकाच बैठकीला ही करुणापूर्ण कादंबरी वाचवणार नाहीं ! तथापि कथानक

पुरें होईपर्यंत त्याच्या मनाला स्वस्थता वाटणार नाहीं, हें मात्र खास ! **किंमत ०-६-०.**

**२२ रमा आणि माधव.** लेखक—श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र. ‘ पन्नाशीची झुळुक लागली बाइल दुसरी करूं नको ! ’ असें लोक सांगत असतांहि एका थेरड्या नवरदेवानें कपाळाला बाशिंग बांधण्याचें धाडस करून शेवटीं आपली कशी फटफजिती करून घेतली, आणि प्रणयी माधवानें बिचाऱ्या रमेचा कसा उद्धार केला, त्याचें चटकदार चित्र ह्या पुस्तकांत आहे. **किंमत ०-४-०.**

**२३ प्रेमकहाणी.** लेखक—श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र. मोंगल बादशहाच्या कारकीर्दींत रजपूत स्त्रियांच्या प्रेमकहाणींपैकीं ही एक करुण कहाणी आहे. ही प्रेमकहाणी वाचतांना वाचकांचे डोळे भरून आल्याशिवाय राहणार नाहीं ! **किंमत ०-४-०.**

**२४ मुरारराव.** लेखक-एक राजारामीयन. गुप्त पोलिसाच्या चातुर्यासंबंधीं ही एक चटकदार कादंबरी आहे. या गोष्टींतील कथानक इतकें चित्तवेधक आहे, कीं, अखेरपर्यंत वाचल्याविना पुस्तक हातांतून सुटतच नाहीं ! **किंमत ०-४-०.**

**२५ भयंकर सूड.** लेखक—श्रीयुत बळवंत हरि पंडित, बी. ए. राजा विक्रम याच्या चरित्रांतील ही एक अद्भुत आणि चित्तवेधक कथा असून विक्रमावर आलेल्या अनेक भयंकर संकटांतून त्याची अद्भुत प्रकारानें कशी मुक्तता झाली आहे तो प्रसंग या कथानकांत आहे. **किंमत ०-४-०.**

## चरित्रें.

**१ स्वामी रामतीर्थ.** लेखक—श्रीयुत नागेश वासुदेव गुणाजी बी. ए., एल्. एल्. बी. आणि श्रीयुत दत्तात्रय बाळकृष्ण कालेलकर, बी. ए. स्वामी रामतीर्थ यांच्या सुमारें २० व्याख्यानांचें ह्यांत भाषांतर दिलें आहे. ह्या व्याख्यानांनीं अमेरिकन लोकांना वेड लाविलें होतें ! मराठी वाचकांची स्थिति तशीच होईल, हें निःसंशय आहे. **किंमत १-४-०.**

**२ स्वामी विवेकानंद**—विवेकानंदांच्या खासगी १८ पत्रांचें ह्यांत भाषांतर आहे. विवेकानंदाचें नांव ठाऊक असणारास या पत्रांतील विचारांची सहज कल्पना होईल. **किंमत ०-४-०.**

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव—मुंबई.**